॥ श्रीः ॥

# काव्यरत्नावली

आलीकडील कविमंडळीनें चालविलेलें

कवितेचें मासिकपुस्तक.

श्लोक.

तीं तीं पदें नित्य फिरूनि येती । त्या त्याच अर्थाप्रति दाविताती
कौशल्य मोठें रचनेंत आहे, । सत्काव्य तेणें नव वाटताहे.

वर्ष २५ वें ) सन १९१४ ( अंक १ ते १२

किंमत १ रुपया.



हें पुस्तक नारायण नरसिंह फडनीस यांणीं जळगांव पूर्वखानदेश येथें बालाजी पेठ म्युनिसिपल घर नंबर ... मध्यें आपल्या बावजी प्रिंटिंग छापखान्यांत छापून जळगांव येथें प्रसिद्ध केलें.

वार्षिक वर्गणी ट. व्ही. पी. सह १। रुपया.

बावजी प्रिंटिंग प्रेस जळगांव.

अंक २ रा.

# श्रीहनुमच्चरित.

## पंचम शतक.

### आर्या.

सूक्ष्मबृहच्चिद्रूपा ! भवगजपंचानना ! निराकारा !
जयविश्वंभरमूर्ते ! आत्मारामा ! नमोस्तु साकारा ! १

आत्मारामसरूपीं तन्मयता पावुनी जहालास--
आत्मारामसरूपा ! नमन तुला, चुकवि भवज-हालांस. २

सुविमलसकलचलाचलहृज्जलजस्थलकलात्मका अतुला,
अतुलसकलबलसबला बलभीम नमो नमो नमोस्तु तुला. ३

अवतरलास जगीं या विमला ! केवळ परोपकारांस,
सुकृतारोपण करुनी निर्दाळिसी पाप-रोप--कारांस. ४

दुरितहरित चरित तुझें भरित दारित कारित गान जो त्याचें,
जें मुक्तीसदनाचें कवि ह्मणती अचल दगड जोत्याचे. ५

त्वत्करुणेविण विद्या कविला कवना समर्थ नच कारे ती,
कालत्रयज्ञ सुरमुनि त्वद्गुणतेचें समर्थनच करिती. ६

त्वद्गुणचरित्र गावें ऐशी इच्छा तशीच गुर्वाज्ञा--
त्वदनुग्रहेंचि झाली कवि कविता कवन तूंचि सर्वज्ञा. ७

चार शतें चरिताचीं अज्ञमुखें त्वां स्वयेंचि गावविलीं,
सुचरितरत्नें पुढतीं करुणेशा ! पाहिजेत गा ! वळिलीं. ८

श्रीसीताशुद्धीच्या वापी उघडीं कथामृतपयाची,
यच्छ्रवणपान होतां बाधा नोहे क्षुधातृषा यांची.
अनुसंधान कथेचें मधुर सुरस चालव सुतोषद जें,
अवधानशील व्हावें मानि ति भवरुग्णतेस औषध जे.
मोक्षश्रीचे जे कां भांडारी संत ते पदीं नमुनी,
प्रार्थित अवधानें हा चरितकथनिं उद्धरोत दीन मुनी.

रघुपतिभक्तशिरोमणि हनुमंत भवांबुसा जलधि तरुनी,
कर्तव्ययोजना करि सुविचार सुवेल नगशिरिं उतरुनी.
मी वडवानल शोषिन असुरार्णव हा न लागतां वेळ,
मत्क्रोधज्वलनें हा ब्रह्मांड--कटाह चांग तावेल
श्रीरामें दशमुख निज भाग असे ठरविला समरहोमीं,
इच्छाभंग प्रभुचा करुनि, करावा कसा समर हो। मी
परि दैत्यव्यालाकुल या लंकावारुळांत मी नकुल,
शिरलों बघोनि सारे होतिल कीं समर करुनि हीन कुल.
मम कार्यभाग शिरतां दृश्यपणें नगरिं या कसा होतो,
गुप्तपणेंही करितां शोध जरी समर होय साहों तो.
जाणें उचित गमे मज करिति नशा असुर त्या निशासमयीं,
होतां निद्रावश ते राक्षसमाया नुरेल भासमयी.
भरला रामस्मरणीं उरला दिनसमय निमिषसा सरला,
कार्योत्साहें स्फुरला अधर अधिरसा स्वमार्ग अनुसरला.
प्राकार ते रणायुत शोभाढ्या ती निरीक्षुनी लंका,
बोले तूलिं अनलसम शोभविसी वैभवीं निजकलंका.
वामपद पुरद्वारीं ठेवुनि नगरीं तया प्रवेश करी,
तंव ते लंकादेवी मार्ग निरोधी धरोनि वेत्र करीं.

बापा ! निशाचरांच्या नगरीं या कोण तूं शिरो बघसी,
फिर मागें ना तरि या मम करघातें न वानरा ! जगसी. २१

नायकतां पदघातें ताडी कपि वामवज्रमुष्टिबळी,
हृदयशिलाभग्नसती रुधिर वमुनि मृत्तिका मुखीं कवळी. २२

सावध होतां वंदुनि बोले कपिकुलमणे ! पवनतनुजा !
त्वां जिंकिलीस लंका रणिं वधिशिल सहज सकलही दनुजां. २३
विधिकथिन काळ आला त्वद्रूपें राक्षसास माराया,
बलभीमा ! या नगरीं कोणी न समर्थ तुज निवाराया. २४
मृतसमचि भासती मज सर्वनगरवासि हे तवागमनें,
साधाया इष्ट तुझें तुज उचित दिसे तसाचि वाग मनें. २५

गुप्तपणें शोध करीं वैदेहीचा प्रतिगृहा--माजी,
परि कोठेंही नुमगे नगरीं त्या रघुवरा प्रियतमा जी. २६
यामार्ध रात्र सरली अमृतस्त्रावी निशापति उगवला,
परि रामदूत बघुनी अनपेक्षित कर्म अंतरीं उबगला. २७
पाहे घरोघरीं जपतपवेदाध्ययनसत्क्रियाचरण,
चित्तीं ह्मणे कारितसे हृदयीं कोपाग्निसीं दयाच रण. २८
संगत नसेल यांना विदितहि अथवा कुकर्म भूपाचें,
दुष्टाचरणहि किंवा भय वाटत यांस भूपकोपाचें. २९
सत्शीलजनां सकळां असुरां समरांगणीं कुणि वधावें,
शस्त्र न सुटे करींचें तंव हृदयांतुनि पुढेंचि किंव धांवे. ३०
अमरां अजिंक्य झालें याचें आश्चर्य काय वाटावें,
निजभक्तसंकटीं त्या प्रभुच्या नेत्रांत अश्रु दाटावें. ३१

बहु शोधिलीं कपाटें सांगगृहें गोपुरें वनोपवनें,
हाट बिदी पशुशाळा यानें क्रीडास्थळें पथिकभुवनें.
शुद्धिव्यवसाय पुढें चालवि तैसाच तो सचिंत मनें,
कारागृहिं शिरतां सुर पुष्पांजलि वाहुनी करिति नमनें.

गहिंवरले वदति हरा हरिरूपा जाहलों मरायास,
या दुष्टाच्या जाचें करिं करुणा आणिं रामरायास.
केला अमरगणांचा बलभीमा! छळ पहा कसा यानें,
कीं धेनुचाहि न जसा मारावें गा! जिला कसायानें.
सहकुल भस्म कराया नलगे श्रम तुजसि फारसा यास,
शिरला गुहेंत मृग तो माराया हरिस काय सायास.
क्रोधानल तव कैसा अस्तित्वा मुकुनि जाहला शांत,
कीं दशमुख शिवपूजक यास्तव पडलास मोहपाशांत.
सुखसर्वस्व तुझें जो राम तयाची हरूनि हा कांता,
जगतां तुझ्या कृपेनें कवण तिच्या हरिल सांग आक्रांता.
त्रैलोक्यसुखाशांकुरीं रघुपति अवतारकार्य तरुमूळीं,
शस्त्राघातापरि हें घातक शिशु जन्मतां जसा मूळीं.
अपराध कल्पकोटी त्रिदशांचे क्षमा करावे गा,
हा बंदिवास चुकवा राघवकार्यक्षमा करा वेगा.

हनुमंत वदे सुर हो! सुरपतिसा तापसा न घातक मी.
सद्धर्माच्या घाताहुनि मज वाटे त्रिलोकघात कमी.
प्रत्यक्ष पाहिलें म्यां दैत्याचें येथवरि सदाचरण,
तूह्मांस्तव त्यांचा क्षय करिनहि परि हारि घेति हे चरण.

सद्धर्मरक्षणास्तव अवतरला रामचंद्र त्यासह मी,
यावच्चंद्रदिवाकर राहुनि व्रतरक्षणास त्यास हमी. ४३
कां व्रतभंग करावा कैसा सांगा अहो! तुह्मांस्तव मी,
काय वमन सेवावें, श्वान जसें सेवि; जें स्वयेंचि वमी. ४४

सुर वदति रामभक्तश्रेष्ठा! समदर्शि तूं अह्मां कळलें,
निर्दंभ तूं, न तुजला दंभाचें गूढ वर्म आकळलें. ४५
निर्विघ्नता कुकर्मीं यांचीं साधावया पुरश्चरणें,
दुर्मेध्यभक्षणीं मन वावरतें श्वानसें पुरश्चरणें. ४६
हरिहि सदा दरींत वसे निबिड वनीं, बकहि झांकितो नयन,
लुब्धकही मौन धरी, गणिका जारार्थ त्यागिती शयन. ४७
खल हे दुर्मतिला वश, अनुकंपेला न पात्र समजावें;
शपथ तुझ्या चरणांची प्रत्यय घेण्यास चारसम जावें. ४८
प्रहर निशा हो तोंवरि कर्मठपण पूर्ण दाविती, परि ते--
धेनुवधादिक कर्में तदनंतर करिति पुण्यकोश रिते. ४९

विस्मित झणीं निघाला परत बघुनि घोर कर्म मनिं विरला,
या असुरांहुनि लोकीं चित्तिं ह्मणे पातकी जगीं विरळा. ५०
पुंगीस नाग तैसा फसलों दंभास वेंचिली रजनी--
दोन प्रहर वृथा म्यां, दोषास्पद कर्मचार हेचि जनीं. ५१
तृणपर्ण पल्लव शिला काष्ट जलाशय न वगळिलें कांहीं,
चित्तिं वदे न गवसतां सीता, जाळिन सदैत्य लंका ही. ५२

सूक्ष्मपणें सकल पुरी शोधन करुनी शिरे महोपवनीं,
रचना बघुनि मनोहर कुंठित होइल वदे कविहि कवनीं. ५३

दिव्योपस्करमंडित क्रीडास्थानें असंख्य जलसदनें,
शृंगारसौख्य जेथें अनुभविलें बहुत काळ दशवदनें.
शोधुनि सकळ स्थानें राजभुवनिं शोधनार्थ तूर्ण शिरे,
पाहुनि अगणित कांता कांतारद्रुमचि मानुनी विचरे.
रूपवती नवयौवनसंपन्ना कामिनी बहु विलोकी,
झालों भ्रमिष्ट बोले खळसंसर्गेंचि या गमे लोकीं.
कैसी सीता देवी लोभास बळीं पडेल रामसती,
हारितां शोक न करिती असती इतरांसमान जरि असती.
सीतालक्षणयुक्ता न दुजीहि दिसे वृथा श्रम जहाले,
भक्षिलि असेल ऐसें मनिं येउनि कोप अधरपुट हाले.

करुनि विचार पळभरीं उड्डाण करी अशोकवनिं जाया,
प्रार्थी रामपदांबुज चिंतुनि गवसो प्रभो! तुझी जाया.
नभचुंबित फलित महा वृक्ष सुपुष्पित लता तरु द्रुम ते,
जलवाह रम्य वापी सकल मनविलोभनार्थ रुद्रमतें.
सेवकसे सुमनांजलि वर्षिति कपिसत्तमावरी फिरतां,
आश्चर्य फार वाटे वनरचना बघुनि रामकार्यरता.
इष्टफलप्राप्तीची आशा मनिंची समूळ मावळली,
दशमुखविभवविघाता कोपभरें वज्रमुष्टि आंवळली.
शोधुनि अशेष उपवन जावें दशकंठकंठ दाबाया--
योजी असें मनीं, तंव नयनपथीं देखिल्या असुरबाया.

बहु गर्जेति, भय दाविति, हो वश असुरेश्वरास, हो जागी
एक वदे ऊठ, दुजी बैसे भक्षण करीं न या जागीं.

सुयशाशा प्रबलपणें झेंपावे शिंशपाद्रुमावरि तो—
कोपोद्रेक विसरुनी बिंदुप्राय स्वदेह आवरितो. ६५
दैत्यस्त्रीसैन्यवलयसंवेष्टित मुक्तकुंतला पाहे,
मलिनांबरा कृशांगी शोकभरें नयनिं अश्रुजल वाहे. ६६

झालों कृतार्थ माते! त्वद्दर्शन लाभलें प्रथम मातें,
संकटिं देखोनि तुला कैसें पावेल चित्त विरमातें. ६७

कोलाहलध्वनीनें तत्क्षणिं आकर्षिलें तदवधान;
येतां बघे दशमुखा कांतांसह लक्षुनी सतीधान. ६८

सीतेसमीप येउनि बहुपरि विनवुनि वदे न लाजाया,
योग्य तुला वश होउनि अधरामृतरस मलाच पाजाया. ६९

क्रोधाग्निरक्तनेत्रा हृदय वचनपविशतें विदीर्ण करी,
समजूं नको मदांधा! व्याघ्रकरीं गवसलें तुझ्या बकरी. ७०
मद्हृदयदेवता श्रीराम तुला करिल सकल भस्म रणीं,
भरले आयुष्य तुझें मेल्या! सुचली तुला अशी करणी. ७१

क्रोधविकल दैत्य तदा खड्ग करीं धरुनि शीघ्र सरसावे,
मंदोदरी निवारी कृतिनें ऐशा तुला जनिं हसावें. ७२

परिरक्षिणींस सांगे द्वयमासाभ्यंतरीं वश करा गे,
भय घालुनि छळ करुनी, इजला वागवुं नकाच अनुरागें. ७३

मासद्वयीं वश न हो तरि पचवुनि मिष्ट भोजनीं खाया,
बाढा मज पाहों दे कवण हिला येत येथ राखाया. ७४

गेला परत निजाया भय दावुनि चारिका रिघति शयनीं,
घोर प्रसंग पाहुनि हनुमंतें अश्रु गाळिले नयनीं. ७५
दुःखोद्वेग न साहुनि सीता निजजीवितास बहु विटली,
उद्बंध केश पाशें स्वकरें घालावया त्वरें उठली. ७६
या समयीं जरि धीर न द्यावा तरि व्यर्थ पोशिला काय,
रघुपतिपदरजसेवक जरि दुःख न हरिल जड शिला काय? ७७

सीताश्रवणनिकट तरुपल्लविं लघुरूप घेउनी उतरे,
प्रिय सुश्राव्य अकल्पित वचनें बोले नितांत मधुरतरें. ७८
रघुकुलवर दशरथसुत कौसल्यानंदवार्धिवृद्धिकर,
श्यामल रूप मनोहर ज्याचे आजानुलंबि दीर्घ कर. ७९
भार्गवधनुपण जिंकुनि झाला वैदेहराजजामात,
भार्गवदर्पहि हरिला लाजविले सुरहि वीरकर्मांत. ८०
ताताज्ञा पाळाया सौमित्रान्वित सभार्य घोर वनीं,
फिरतां असंख्य वधिले दैत्यांतें मत्कुणां जसें भवनीं. ८१
बहु काल गौतमीतटिं घालविला, त्रिशिरदूषणखरातें—
वधुनि रणीं सीतेस्तव हेममृगातें वधीत मुखरातें. ८२
यतिवेषें हरण करी वैदेहीतें दशास्य शोकवनीं--
लोटुनि पतिसह, तिजला ठेवी लंकापुरीं अशोकवनीं. ८३
विरहाकुल रघुनंदन सानुज वनिं शोधितां तिला दमला,
मनमोहक गुरु माझा दिसला पंपातटीं विषण्ण मला. ८४

सुग्रीववानरासीं सख्य करुनि कामिनीहरा वधिले,
वालीतें जेणें या दशकंठा धरुनि कक्षिपुटिं मृथिलें. ८५
पवनाचा तनय, सचिव सुग्रीवाचा, रघूत्तमपदाचा—
अंकित सेवक माते! प्रतिकार करील राक्षसमदाचा. ८६
तवशुद्धीस्तव दशदिक्प्रांतीं सुग्रीवराज कपिसेना--
प्रेषी, तयांतिलचि मी एक; जया स्थळ अगम्यचि असे ना. ८७
जननी! तव शुद्धीस्तव शतयोजनवारिधी तरुनि आलों,
तवदर्शनेंचि धालों त्रिजगीं या धन्य धन्य मी झालों. ८८

सीता साशंक वदे वचनाची सत्यता मला दावीं—
सत्य स्वरूपहि तुझें, वचभारें वैखरी न लादावीं. ८९

श्रीराममुद्रिका करसंपुटिं पडतां उरीं धरी तिजला,
दर्शन पुनः पुन्हा घे वाहुनि विरहाग्नितप्तनेत्रजला. ९०
शोकभरें आक्रंदे बोले प्रियसंगतीस अंतरलें,
नामस्मरणें ज्याच्या दुस्तरभवजलधि बहुत जन तरले. ९१
अश्रुप्रवाह वाहे पाहुनि पाषाणही गमे द्रवले,
भूमीवरी टपटपां हिमबिंदू वृक्षपल्लव स्रवले. ९२
पाहुनि हनुमंताचें लघु कोमल वपु वदे पवनतनया!
रणिं वधिसिल दैत्य कसे टाकुनि करिसी गमे विनोद नया. ९३
रामकथा ऐकुनि मम संतप्तमनास शांतता यावी,
यास्तव वानरवेषें ठकविसि मज असुनि दैत्य मायावी. ९४

हनुमंत वदे माते! रघुपतिची आण दास मी त्याचा,
कार्यपरत्वें लघु गुरु होतों हा दिसत वेष नित्याचा. ९५

श्रीराममुद्रिका मम हस्तकिं यावी कशी विचार करी,
विश्वास पूर्ण नसतां नृपमुद्रा कैं पडेल चारकरीं. ९६
निजविश्वरूप दावी गुह्य रघूत्तमकथा श्रवण करवी,
बोले इच्छित मनिचें साधीं या चरणसेवकाकरवीं. ९७
श्रीरामा भेटवितों स्कंधीं वाहुनि तुला क्षणांत, न भीं;
विश्वीं विघ्न कराया असमर्थचि रामसेवकास नभीं. ९८

सीता वदे कपींद्रा! मद्वृत्त समग्र रघुपतीचरणीं,
करुनि निवेदन उभयां आणीं दशमुखवधार्थ शीघ्र रणीं. ९९
सांग कुशल उभयांतें थकलें मार्गप्रतीक्षणा करितां,
मानसिं वाटत होतें मजसाठिं कराल विश्वगोल रिता. १००
करुणाकरा! दयाळा! झाले अपराध मानसिं न आणा,
पदसेवेच्या जगलें आशेनें सांग घेत शत आणा. १०१
सौमित्र भाउजीला सांगें बहु बोललें कठोर तुला,
फल भोगितें तयाचें क्षांति धरीं बा! दयालुता अतुला. १०२
ऐसा निरोप सांगुनि चूडामणि देउनी वदे कीशा,
हा प्रत्ययार्थ घेईं सांग कुशल वृत्त वानराधीशा! १०३
मासद्वयान्त होतां न जगें मी काळजी धरा याची,
द्या प्राणदान मजला पददासी हेंचि सुंदरा याची. १०४
ऐसा निरोप सांगुनि बोले वत्सा! त्वरा करीं जाया,
बघतील दैत्य तुजला विघ्नें करितील हानि काजा या. १०५

उपवास दों दिसांचा त्वद्दर्शनपारणें मला घडलें,
आज्ञा करिशील तरी मी भक्षण करिन पक्व फल पडलें. १०६

सीतेस धीर देउनि पक्वफलें भक्षुनी पदीं नमुनीं,
मानुनि कृतार्थता मनिं स्वपथ यथागतचि जाय आक्रमुनी. १०७

सद्गुरुहनुमंतें श्रीसीताशुद्धी करोनि लवलाही,
२.श जोडिलें वदविलें निजचरित करावया दुरितलाही, १०८
सद्भक्तशिरोमणि जो सद्गुरुहनुमंत खाण बुद्धीची,
तेणें कथा वदविली शतकीं रघुपतिकलत्रशुद्धीची. १०९

शतक पंचम समाप्त.

यशोधन.

---

## श्रीमद्भगवद्गीता.

### अध्याय ७ वा.

### विज्ञानयोग.

माझ्या प्राप्तिकरितां हजारांत एकादा यत्न करतो--अशा हजारो एकाद्यांत एकादाच मला जाणतो--सृष्टीचें बीज माझ्या प्रकृतींत आहे. सर्वांतील सारभूत तत्व मी आहें--सत्व रज तम या गुणांची उत्पत्ति मजपासूनच आहे परंतु त्यांत मी नाहीं--मला जे अनन्यभावें शरण येतात तेच माझी मायानदी तरतात--चतुर्विध भक्तांत ज्ञानी श्रेष्ठ. केवळ वासनांच्या मागें लागलेले जे आहेत ते विविध देवतांना भजतात, त्यांना फळ मिळतें पण तें नश्वर असतें--पूर्वीं होऊन गेलेल्या, पुढें होणाऱ्या व आज असणाऱ्या सर्व भूतांना मी जाणतों पण मायेनें ते मला जाणत नाहींत--अधिभूत अधिदैव व अधियज्ञ यांसह मला जे जाणतात ते अंतकाळीं माझें स्मरण करून मलाच पावतात.

आर्या.

श्रीकृष्ण:—

वाहुनि मन मज पार्था! मदाश्रयें योगयुक्त होतांच,
नि:संशय पूर्णत्वें जाणसि मज केंवि ऐक तें साच. १
कथितों ज्ञान तुला तें स्वानुभवासहित पूर्ण पार्था रे!
जें जाणतां उरे ना जाणाया विश्विं कांहिं या सारे. २
एकादा यत्न करी मत्प्राप्तीस्तव सहस्र लोकांत,
त्यांतहि एकादाची जाणाया मज समर्थ निभ्रांत. ३
जलभूमितेजवायू बुद्धिमनोनभ तसा अहंकार,
अष्टविधा ही माझी मूर्ती घडवी जगीं चमत्कार. ४
गौणी प्रकृति मदीया श्रेष्ठ परी जी दुजी पृथा--बाळा!
विख्यात जीवभूता आहे आधार तीच जगताला. ५
दोन्ही प्रकृति अशा या कारण बा! मुख्य सृष्टिचें पाहें,
कर्ता, सर्वनियंता लोकनिहंता ह्मणोनि मी आहें. ६
माझ्याविण नच दुसरें कारण या बा! समग्र विश्वास,
मजमधिं--सूत्रीं मणिसे--ग्रथित सकल जाण हें सविश्वास. ७
उदकीं जो रस तो मी शशिसूर्यांचीहि जी प्रभा मीच,
प्रणवाक्षर वेदीं मी मनुजीं पौरुष नभीं ध्वनी मीच. ८
मी पुण्य गंध भूचा अग्नीचेंही पवित्र मी तेज,
जीवन जीवांचें मी मीच तपस्वी जनांतलें ओज. ९
मी बीज सनातन या सृष्टीचें, बुद्धि बुद्धिमंतांची,
तेजोराशीची मी साक्षात् तेजस्विता असे साची. १०
इच्छा प्रीतिरहित जें बलवंतांचें अमोघ बल तें मी,
धर्मानुकूलकारी कामजनीं तोहि मी असें नामी. ११

सात्विक राजस तामस पार्था ! हे भावही मदुत्पन्न,
राहे न त्यांत परि मी वसती माझ्यांत ते सख्या ! जाण. १२
त्रिगुणात्मक विषयांहीं ठेलें हें विश्व सर्व मोहून,
मजला त्रिगुणातीता जाणें तें अव्ययास कोठून. १३
त्रिगुणमयी माझी ही दैवी दुर्घट दुरत्यया माया,
रिघती शरण मजचि जे तरती इज तेच मात्र कौंतेया ! १४
जे आसुरी प्रवृत्त्यांकित मोहें ज्ञाननष्ट जे पापी,
अधमाधम दुष्कृति ते येती मजलागिं शरण न कदापी. १५
जिज्ञासु रोगपीडित भोगार्थी जे तसे खरे ज्ञानी,
येती चतुर्विधा हे शरण मला नित्य पुण्यवान् प्राणी. १६
ज्ञानी मदेकपर जो अनन्य योगें मला भजे नित्य.
प्रियतम मी बहु त्याला प्रियतम तोही तसाच मज सत्य. १७
बरवे सर्वचि जरि हे ज्ञानी तरि त्यांमधीं मदात्माच.
अर्पी जो चित्त मला स्वाश्रय सद्गति गणोनि मजलाच. १८
बहुविध जन्मानंतर शेवटीं ज्ञानी मलाच तो मिळतो,
मन्मय विश्व बघे जो थोर महात्मा असा सुदुर्मिळ तो. १९
बहुविधकामीं झाले जे नष्ट ज्ञान जे मनोदास,
मदितर देवां भजती तदुपासननियमिं सोसुनी त्रास. २०
जो दैवतास ज्या ज्या करि इच्छा श्रद्धया भजायाची,
त्यांची त्यांची श्रद्धा स्थिरवी मी त्याच दैवतीं साची. २१
श्रद्धान्वित होउनि तो लागे त्या देवतेसि अर्चाया,
पुरती सकल तयांच्या इच्छा पुरवीत मीच कीं, आर्या ! २२
नश्वर परि तें फल बा ! जें मिळतें अन्यदेवताभक्तां,
देवोपासक देवा पावति मद्भक्त मजसिही पार्था ! २३

अक्षरअव्ययसर्वोत्तममद्रूपा यथार्थ नेणोनी,
मज बुद्धिहीन भजती अव्यक्ता व्यक्तरूप मानोनीं. २४
गवसे नच सर्वां मी वेष्टित कीं गाढयोग मायेनें,
अज मी अव्यय मी मज मूढ सकल लोक हा मुळीं नेणें. २५
झालीं पूर्वीं जीं जीं असती संप्रति पुढेंहि जीं होती,
त्या सर्वां भूतातें जाणें मी परि न जाणती मज तीं. २६
इच्छाद्वेषसमुत्थित सुखदुःखविमोह मूढ हीं सारीं--
भूतें उत्पत्तीच्या कालीं संमूढ होति निर्धारी. २७
पुण्यप्रदकर्मीं परि गेलें यद्दुरित पूर्ण विलयातें,
सुखदुःखमुक्तअचलव्रत ते भजती सदैव कीं मातें. २८
इच्छति मदाश्रयें जे जन्मजरामरणमोक्ष मिळवाया,
ते ब्रह्म जाणती बा ! आध्यात्मिक कर्मही तसें विजया ! २९
अधिभूतदैवयज्ञासह जे मज जाणतात योगी ते,--
मजचि प्रयाणकालीं पावति चिंतूनि मत्पदाब्जातें. ३०

अनंततनय.

## एकांतांतील गाणें.

### श्लोक.

जी दृश्यादृश्य सृष्टी अनुदिनिं दिसते लोचना मानसा या,
ती सारीही परेशा ! तव रुचिर यशोद्योतिका खास आहे.
आत्मीयांशें तदंतीं प्रतिवसुनि सुधासेक चोंहीकडेही,
ब्रह्मांडाधारदेवा ! प्रतिपाळिं कारिशी, हा कवी जाणतों हें ! १
जेव्हां मन्मानसीं या नवनव कविता येतसे संस्फुरोनी,
तेव्हां त्वत्कीर्तिची हीं घटक पृथुतरें सृष्टिरूपें अनंतें;

येती धांवोनि वेगें हंसत हंसत तीं, तींमधें संचराया,
मीही सप्रेम त्यांतें मग धरुनि मनें ईश्वरा ! आदरीतों ! २
साध्या भोळ्याहि वेली, विफलहि विटपीं, नीरसें वन्य पुष्पें,
औदास्योत्क्रांतिपूर्णा उपलतति, वनप्रांतवासीहि पक्षी,
विश्वात्मन् ! सर्वही हीं मजपुढति अहा ! गोड रूपें धरोनी,
घेती सद्गौरवातें, मम मन फुलतें पाहुनी यांस लोभें ! ३
तारांचे सांद्र पुंज प्रकट उधळितों एथ लीलाभरें मी,
सौगंध्योद्दाम पुष्पें गगनिं फुलवितों नित्य एका निमेषें;
ग्रीष्मींही वाहवीतों अमृत मधुरसें निर्झरां शैलशृंगीं,
विश्वेशा ! या परीनें तुजसि भजतसें खेळुनी सृष्टिसंगें. ४
पुष्पाला वा प्रियेला प्रणयरसभरें नित्य संगीत गातों,
नेणें निंदेस माझ्या करिति बहुजवें निंदकांचे थवे हे;
लागावें मीं कशाला अरसिकवदना सोडुनी स्वोद्यमातें
हीं पुष्पें वा प्रिया ही तुजविण दुसरीं काय आहे परेशा ! ५
पुष्पें वा ही प्रियाही तुजजवळि विभो ! पायरी यावयाची,
गातों मी त्यांस गाणीं मज नच समजे वाउगें यांत काय ?
पूर्णाशें जेथ लागे प्रतिपळिंहि मुदा मानसाचा समाधि,
तो तूं नाहींस काय प्रभु ! मग करिती कां असे लोक निंदा ? ६
चिंतेनें या उठे तें निजहृदयपटीं कृष्णविक्षेपचिन्ह,
मस्तिष्कामाजि देतें उसळुनि सहसा घोरशा संगरातें;
मत्काव्याला अशांचा प्रभु कधिंहि नको होउं देऊं विटाळ,
त्याच्यापेक्षां मिळो तें विरुनि अनुदिनीं भव्यशून्यांतरालीं. ७
ब्रह्मांडाधारईशा ! घडि घडि करिशी मन्मनीं प्रेरणा जी,
ती मी संगीतरूपें प्रकटुनि जगतीं देतसे विस्तरोनी;

माझ्यामागून त्यांचे मजहि नच कळे काय होणार आहे ?
हे सारे आर्यलोक प्रकट असति कीं पारखी गाजरांचे ! ८
आह्मी हे आर्य सारे बकुल विटपिचें पुष्प घेऊन हातीं,
फेकोनी त्यास देऊं झणिं ह्मणुनि तया ' हें असे रान फूल !'
हें सारें जाणतों मी, परिहि भरतभूमातृभावीयशोर्थ—
ठायीं ठायींहि देतों उधळुनि जगतीं गायनस्वर्णपुष्पें ! ९
अंध: प्राच्याभिमाना विसरुनि मम हें काव्य जें वाचतील
येतील स्पष्ट त्यांतें दिसुनि विकसनप्रोल्लसत्पद्मखंडें !
नव्यश्रीसूर्यबिंबाउदयनगशिरीं पाहतील स्वयें तें,
देखाया लाभतील द्रुत सहज तया वायुचीं मंजु लास्यें ! १०
हें सारेंही असो, हे विभु तव ललिता सृष्टि माझ्यासमोर,
येऊं दे प्रत्यहीं ही हृदय उघडुनी आपुलें गानपूर्ण;
तीतें मी गात गात प्रणयसुवश हा आयुचा उत्तरार्ध—
नेवोनी अंतिं व्हावें तवचरणकृपापूर्णगंगेत मीन. ११
एकांतांतील गाणें तुजजवळि विभो ! येउनी गायिलें हें,
जें चित्ता वाटलें तें तुजसि कळवुनी टाकिलें एकदांचें;
माझें हें चित्त देवा ! तुजविण दुसरा कोण तो जाणणारा !
सांगावें काय तूतें अधिक ? असासि तूं सर्वसाक्षीपरात्मन् ! १२

नागेश.

---

## कवितादेवीचें आगमन. (पद.)

कल्पलतांचे करुनी दोले
हांसत मृदु मधु गाति तारका
गळले आनंदाश्रुपय:कण
त्यांस तरंगुनि उज्ज्वल जीवन जिला जाहलें संप्राप्त; १

आकाशांतुनि कोसळणारी
चंचलवीचिविभूषित गंगा
तिच्या सुधोपम रसांत पोहुनि
जगत्पावनी निरुपम शुचिता जिला लाभली दैवानें; २

सरस्वतीच्या वीणावादनिं
नादस्रोतस्विनी उठे जी
तिच्या तुंग अभिनव कल्लोळीं
करुनी मज्जन जिच्यांत आलें मार्दव हृदयंगम दिव्य; ३

रानफुलांची विमुग्ध वृत्ती,
बालनिर्झरांचा आनंद,
गिरिसरितांची ललितधीरता,
तडिल्लतेचे स्वैर विहार, व्योमाचें स्थिर गांभीर्य, ४

वासवधनुची चिरनूतनता,
प्रियवचनाची मोहकारिता,
रमणीचीही रुचिर सरलता,
घेउनि गुण हे कविता देवी ज्योत्स्नेमधुनी अवतरली ! ५

तिच्या दृष्टिच्या तेजें सारें
विश्व-वलय जाहलें समुज्ज्वल !
दिव्य तारका, काळे फत्तर,
एकच तेजीं स्नात होउनी प्रतिबिंबित झालीं अन्यीं ! ६

सारीं बिंबें, सारीं तेजें,
वस्तु समस्तहि, जगत् चराचर,
दूरदूरचे अनंत गोल,
येउनि झरझर तिच्या स्वरूपीं क्षणांत झाले ते लीन ! ७

बघतां बघतां मीहि अहंता
विसरुनि बनलों कवितारूप;
जगांत कविता, हृदयीं कविता,
कविता—कविता एथें तेथें! कवितेनें शून्यहि भरलें! ८

गुलाब आणिक त्याचे कांटे
गंगालहरी, वन्हिज्वाला,
एकच एकक सारें झालें!
दुःखाश्रूंनां स्वरूप आलें क्षणांत आनंदाश्रूंचें! ९

शोक हरपला, हास्यहि गेलें,
आहे नाहीं सारें सरलें,
परत्व लपलें, मीपण कुठलें?
स्वयंज्योतिनें विश्व कोंदलें, तिमिराला कैसा ठाव? १०

मी कविता, कविता मी, अथवा
नव्हेचि आह्मी कुणी तत्त्वतां
आहों नाहीं एकचि ही स्थिति
या विश्वाचा जनिता अथवा मीच असें सारीं भुवनें! ११

केवळ माझ्या या दृक्पातें
होतिल भस्मचि अनंत काल!
अनंत विश्वें माझ्या उदरीं
मीच खलांचें शासन केलें पुरा घेउनी अवतार! १२

विभूति माझ्या जगीं पसरल्या
सर्व दृष्टिचें केंद्र एक मी
चिदानंद मी स्वयें प्रकटलों
स्वागत माझें करावया या चिमण्या तरण्या बाळांनों! १३

या या तारांनों ! या जलधर !
या सरितांनों ! वन पुष्पांनों !
यशोगीत मम गा चंडोला !
रजनिवल्लभा पीयूषाचा करीं मजवरी अभिषेक ! १४

अनंत भुवनांचा मी स्वामी
मालक कवितेच्या हास्याचा !
कोण सांग मी, वसतों कोठें ?
तुझ्यांत केवल नव्हे अहर्निश चराचरांतहि आहें मी ! १५

रेंदाळकर.

---

## प्रातःकाळीं नगराचा देखावा.

Earth has not anything to show more fair.
Wordsworth.

श्लोक.

दावाया रमणीय वस्तु पृथिवीपाशीं नसे एकही
याहूनी, मतिमंद तोच जगतीं यच्चित्त ना लोभतें
देखावा स्पृहणीय भव्य बघुनी ऐसा मनोवेधक;
आतां शोभतसें जणूं नगर हें दिव्यांबरें वेष्टिलें १

प्रातर्नूतनदीप्तिवंत अवघें; निर्धूम निस्तब्ध हीं
शीडें, नाट्यगृहें, कितीक घुमटें, देवालयें, गोपुरें
दूरप्रसृत उंच उंच दिसती सुस्पष्ट, तेजोयुत
तेथें सर्व चहूंकडे तळपतां नीलांबरीं निर्भर. २

बालार्कें इतुक्या मनोहरपणें केव्हांहि ना न्हाणिले
रानें, शैल, दऱ्या, इथील सगळें हें दिव्य--तेजोजळें;

केव्हां देखिलि मी न, नानुभविली गंभीर ही शांतता;
जाते वाहत ही सुमंद तटिनी छंदें इथें आपुल्या;
सारीं येथिल भासती अहह ! हीं गेहेंहि निद्राकुल,
तैसा एक विशाल हा पहुडला आत्मा असे निश्चल, ३

——————— नारायण महादेव भिडे. बी. ए.

## बाण आणि गान.

I shot an arrow into the air.

H. W. Longfellow.

श्लोक.

मी सोडिला वरति एक हवेंत बाण,
आला धरेवरि, न ठाउक तें ठिकाण;
होती गती चपल कीं इतुकी तयाची,
मद्दृष्टि त्यापुढति कुंठित होय साची. १

मी गाइलें मुदित एक हवेंत गान,
आलें धरेवरि, न ठाउक तें ठिकाण;
दृष्टी सुतीक्ष्ण बलवंत असे कुणाची
धावेल धाव अशि जी द्रुत गायनाची ? २

जातां बहूत दिन नंतर तोचि बाण
झाडीमधें गवसला मजला अभिन्न;
साद्यंत गानहि गत प्रिय लाधलें तें
मित्राचिया मम पुन्हां हृदयांत मातें. ३

——————— नारायण महादेव भिडे. बी. ए.

## अंधारांत सांपडलेल्याचें गाणें.

### श्लोक.

मागेंही पुढती नभीं पदतळीं--दाही दिशाभीतरी--
सांचे घोर तिमीर मार्ग न दिसे अत्यल्प भूमीतळीं,
ठेंचाळून पडें कितीक रुतती कांटें खडेही पदीं;
एकाकी विपिनांतरीं गवसलों धावा कुणी सोडवा! १

खांचा कंटकपूर्ण दुर्धर पुढें वासून "आ" बैसल्या,
नाना कंटकयुक्त वृक्ष दिसती आलिंगनार्थोत्सुक;
गर्वें दुर्बळ काजवेहि पुढती येऊन वेडावती,
झालों खास पुरा निशाचर, पिशा ऐसा फिरें काननीं. २

वर्षाकाल नसोनि मेघ गगनीं दाटोनि आले कसे?
छाया भूमिगता कराल गगनादर्शीं पडे वाटतें;
डोकावून हळूच मेघपटलामागें दडे तारका,
पाहोनी व्यसनार्त हाय! मजला ऐसें करी वाटतें. ३

कर्णां कर्कश लागतात उठती जे कीटकांचे रव,
विश्वांतील तमांश काय वमती जो सांचलेला हृदीं;
सृष्टीचें भयद स्वरूपचि दिसें जेथें पहावें तिथें,
तच्छाया हृदयांतरीं उमटली विक्राळ भेसूरशी. ४

चालूं काय पुढें असून पद हे पंगू पुरा जाहलों,
दृष्टीनें कर टेकिले, मज गमे पूर्णांधता पावली;
झाले कर्ण बधीर, पूर्ण विलया गेली स्मृती सर्वही,
आतां यांतुनि सोडवील मजला आहे जगीं का कुणी? ५

—— महादेव भिमाजी कुळकर्णी.

## नैराश्यांतील आशाभंग.

श्लोक.

गेला मावळुनी रवि; प्रगटला अंधार चोंहीकडे;
नक्षत्रें दिसतात तोंचि भरली मेघावली अंबरीं;
शंपेचें क्षणमात्र कीं स्फुरणही तेजाळ तें ना घडे;
वा खद्योतहि एक तैं न चुकुनी ये दृष्टि मार्गावरी. १
ऐशा मी समयास कंटकमयी रानीं पडे जाउनी;
मातें दाखविती पशू भय, तदा अंगीं भरे कांपरें!
नेत्रांतूनि गळे धरे जल, जसें मेघांतुनी त्या त्वरें;
वाटे प्राण नको, विषण्ण मन हें होई बहु त्रासुनी! २
येई चित्र तिथें प्रभा सहज, जी वेधी मदीया मना;
जाई मी विसरूनि भान, भय, कीं त्या घोर ऐशा वना!
प्रेमाचा मम सत्प्रकाश मिसळूं लागे प्रभेशीं तया;
हा! हा! लुप्त परी मला त्यजुनि ती, होई क्षणीं निर्दया!!
नैराश्यीं हृदयांत आस निपजे, लोपे क्षणाभीतरी!
याहूनि त्रिजगीं असेल दुसरें कां दुःख कोठें तरी? ३

सुमंत.

---

## विमनस्कपणा.

( साध्या फटक्याची चाल. )

पद.

शिडें उतरलीं, वल्हीं हरपलीं कर्णहि भंगुनियां गेले!
कर्ण--धार--वृत्तिही निमाल्या; तारूं भडकें! हें मलें!! १
ठाव मिळेना कोठें मजला वृत्ति विहीना दीनाला!
जिकडे तिकडे अफाट जलधी धरी भयंकर रूपाला!! २

दृग्गोचर मत्कृत्यीं होई विमनस्कपणा क्षणोक्षणीं;
मनोदधिवरि क्षोभ मांडिला पर्वत—सम या वीचींनीं ! ३
उडुनी जाऊं गगनीं, किंवा मरूं, पडूं, कीं काय करूं ?
सूचे न कांहीं मजला आतां दिशा तरी कोणती धरूं ? ४
अनन्यभावें शरणागत मी भगवंता ! त्वत्पदांप्रती;
तुझ्याविणें देईल कोण गा ! ऐशा कालीं योग्य मती. ५
सहृदय कविते ! मज दीनावरि करीं तरी तूं अनुग्रहा;
स्निग्धसंगमें तुझ्या खरोखर शमना पावें दुःख महा. ६
सहृदय—कवि—गण—चित्त--स्थायी कलिकालाची ठेव जशी;
कीं इहलोकीं स्वर्गसौख्यदा देवी तुल्या परिसाशीं. ७
दुःखनिराशा--तिमिर--व्याप्ता माझ्या स्वांताकाशाची--
उषाराणि तूं होउनि येईं, उपमा मग तुज परिसाची. ८

कृष्णानुज.

## वियोगिनी.

" इतक्यांत प्रवासास गेलेल्या आपल्या पतीच्या निधनाची वार्ता कोणी तिला कळविली. जणुं विधिला तिच्या शोकरसाची परीक्षाच बघणें होती ! " नंतर—

( वियोगिनी--वृत्त. )

पतिच्या निधनास ऐकतां-- । कदलीच्या सम ती पडे क्षितीं
असती जवळीं जरी सख्या । तरि त्या सांवरली न ती सती १

करिती जल--सिंचन--क्रिया । कटि--वस्त्रें पवनास वारिती
विवशा नच हो विबोधिता । बहु केले सदुपायही जरी. २

उठली परि संभ्रमें पुसे । प्रिय आले वद काय ? कीं कुठें ?
कळला भ्रम हा पुरा असे । तइं सीमा असुखास ना उरे. ३

पडली धरणीवरी पुन्हा । कबरी विस्खलिता असे जिची,
पिटिते हृदया पुनः पुन्हा । जल--धारा गळती कुचावरी. ४

सखया मज सोडुनी इथें । बसशी जाउनि स्वर्गीं तूं कसा ?
बघतें पथ मी तुझा इथें । न कळे काय तरी करूं बरें. ५

त्यजिली मम मैत्रि तूं खरी । ह्मणुनीया बहु खेद होइ हा.
कपटी बहु काल हा तरी । असु तूझे हरि, ठेवि कां ? मम. ६

"मज दर्शन होइल" प्रिया ! । मनिं आशा तरि होति ही परी,
न उरे किमपीहि ती अतां । दिन कंठूं वद हे कुणावरी. ७

जल--संचय शुष्क जाहला । वद मत्स्यी जगते कशी ? तिथें.
तरु दग्ध. तदाश्रिता लता । "विहरे" हें श्रवणीं न ऐकिलें. ८

पडला विधि--घात आडवा । गृह भासे मज कानना सम.
करि अप्रिय ना तुझें प्रिया ! । मग कां ? ही धरिलीस मुग्धता. ९

क्षणिं कस्तुरि चंदनान्विता । हरिणाक्षी फिरली तिचीच ही.
दिसते तनु धूलि--धूसरा ! । कशि हा ! हा ! करणी विधे ! तुझी. १०

स्मितहास्य करूनिया तुला । गमनीं प्रेमकटाक्ष फेंकिला.
मुरडी नयनास तूं तसा । निज--संवादचि शेवटील तो. ११

गळतां कटि--मेखला मम । झणि तूं सांवरिली कितीकदां.
रुदिता पडली सखी तुझी । उठवीशी तरि येउनी न कां ? १२

किति शोक करील ती बरें ? । तिज आजन्मचि साहणें असे.
कविचें मन मात्र सुकोमल । तिजसी आठवितो घडी घडी. १३

——————— दुर्गाप्रसाद आसाराम तिवारी.

# काव्यरत्नावली.



अंक ४ था.

## शिबिराजचरित्र.

आर्या.

यमुनासंनिध धन्या असति जला उपजला शुभा सरिता,
जेथ उशीनर नृप करि निजयजनें हरियशोंबुधीस[1] रिता. १

होउनि कपोत अनल[2], श्येनहि देवेंद्र शीघ्र होउन ये,
सत्वपरीक्षाव्याजें, कीं हा नृप गीतकीर्त होउं नये. २

व्योमीं उडे कपोत श्येनभयानें उरीं भरे धडकी,
काळाची टाळावी न कळे कैशी भयप्रदा धडकी. ३
भेणें कपोत येउनि आश्रय करुनी नृपोरुदेशाचा,
बैसे दबोनि धरुनी स्वमनीं विश्वास त्या नरेशाचा. ४

बोले राय कपोता कुरवाळुनि, 'हे विहंगमा वद रे!
कापसि थरथर वारंवार जाय तुझा का वृथैव आव दरें'? ५

बोले कपोत, 'राया! माराया श्येन खग मला टपला,
गमतें आयुष्याचा आजचि बाजार सर्व आटपला. ६

---

१ इंद्राच्या यशोरूप समुद्रास. २ अग्नि.

'या दीना रक्षाया तुजवांचुनि अन्य कोण हे राया !
व्योमीं श्येन विहंगम घिरट्या घाली स्वभक्ष्य हेराया. ७

नृप बोले 'धीर धरीं येऊं दे पक्षिनायका ! लक्ष,
श्येन असे, वाराया मत्करधृत हा समर्थ शर दक्ष.' ८

तों यज्ञमंडपीं ये श्येन धराया कपोत पक्ष्याला,
वारी स्वयें नृप तया स्वाश्रितजनरक्षणीं, विपक्षाला. ९

बोले श्येन 'कपोता ! राजा तुज हा भला भला गमला,
पाळील कोठवरि हा क्षुद्र तुझें कोमलांग सांग मला. १०
'बहु डाव पेंच तैसे व्याप सदा राजकारणीं असती,
रे ! राज्यभार सोडुनि राजे तुज का जपावया बसती. ११
'आज न उद्यां तरी तूं पडशिल माझ्या भयप्रदीं उदरीं,
रे ! भक्ष्यभक्षकांचें जन्माचें वैर बांधिलें पदरीं. १२
'हा नृपवरकरपंजर सुखकर तरि साम्य काय नीडाचें ?
तुज गृहसुख अंतरलें, हें शल्य न का तुझ्या मनीं डांचे ? १३
'व्योमीं स्वैरविहारी तूं तव दैवीं सुवर्णपंजर हा,
आतां नृपसदनीं तूं वासुनि अन्नार्थ वदनकंज रहा. १४
'राजे मृगयाव्याजें खगमृगहननीं दयानयाला हे—
त्यजिती, दास्यत्वांतीं चिंताभर जीवित क्षया लाहे. १५
'श्येनभयाहुनि येथें पक्ष्या ! तुज संकटा उणें काय ?
मार्जार लाळ घोटी गट्ट करूं तव कधीं ह्मणे काय. १६

'राजा ! सोड कपोता जीवनकलहप्रसंग नित्याचा,

आह्मामध्यें पडुनी पाप न कारें पक्ष घेउनी त्याचा. १७
' धर्माधर्मज्ञा ! तुज तत्वें जनरीतिचीं सकळ कळती,
हा भक्ष्य होय माझा पोटाची कठिण जाण कळकळ ती. १८
' लोकीं ख्यात असें कीं, ' जीवोजीवस्यजीवनं ' नृपते !
निशिदिनिं चळवळ करुनी उदर भरायास विश्व हें खपतें. १९
' निजकाव्यदोष जैसे कविला दिसती न, या तुझ्या नयना—
परदु:ख तेविं न दिसे, तुझिया राज्यीं असाचि हा नय ना ? २०
' मारो श्येन कपोता कपोत तैसाचि अन्य सत्वातें,
दोघेहि सारिखे तुज न्यायाच्या तूं स्मरे सुतत्वातें. २१
' अंकाश्रयें[1] महत्वचि ये, या क्षुद्रा[2] विवेकशून्यातें,
अंकाश्रयेंचि[3] जैशी किंमत येते अनेक शून्यांतें. २२
' रक्षुनि कपोत मातें प्राज्ञा ! तूं सज्ज होसि माराया,
रे ! धर्म हा बरा का ? आतां विश्राम दे यमा राया ! २३
' करुनी कपोतरक्षण ' ' जोडिन मी धर्म ' हें तुला वाटे,
अन्यायेंचि तुवां परि लावियले धर्महेतुला वाटे ! २४
' तूं राजा मी रंकचि, हरिलें पक्वान्नपात्र तुजपुढचें—
रंकें, जरि तरि कैसें असतें सुख तें कळेल तुज पुढचें. २५
' क्षुधितासि अन्न द्यावें परि तुज माझेंचि अन्न हाराया,
शंका मुळीं न, कैसा लाविसि नांवा कलंक हा राया ! २६
' रे सोड भक्ष्य माझा विनवूं कितितरि मला क्षुधा बाधी,
जोडो पुण्यफलाला सुविचारानें तुझी बुधा ! बा ! धी. २७

बोले राय ' श्येना ! शिव ! शिव ! ऐशीं वदों नको वचनें,

---

१ मांडीच्या आश्रयानें. २ कपोतास. ३ अंक मागें नसेल तर अनेक शून्यांस किंमत नसते.

शरणागतावनाचें पुण्य मिळों देचि पाळुनी वचनें. २८
‘ हा अभ्यागत धांवत कांपत ये प्राणरक्षणा याची,
द्यावी नीचापरि का म्यां तुजला प्राणदक्षणा याची ? २९
‘ अझुनी थरथर कांपे धडधडतें हृदय पंख फडफडती--
तुझिया भेणें श्येना ! प्राणाची कठिण जाण तडफड ती. ३०
गोब्राह्मणहननाहुनि भारी विश्वासघातपातक रे !
मित्रा ! निजाश्रिताचा करणें का उचित घातपात करें ? ३१
‘ श्येना ! परोपकारा थोर महात्म्ये जनांत अवतरले,
जे धन्य धन्य बा ! ते उपकारबळेंचि जाण भव तरले. ३२
‘ स्तुत्य दयागुण मित्रा ! आण दयेची मनांत मीमांसा ?
होणार काय याच्या सांग सख्या ! अल्प सेवुनी मांसा. ३३
‘ ओपावें प्राणातें सुज्ञें परि आश्रितां न ओपावें,
यास्तव बालकपोता, देणें उचित न सख्या ! न कोपावें.’ ३४

बोले श्येन, ‘ नृपाळा ! आहारचि सार जीवना जगतीं,
प्राणी असंख्य असती परि ते अन्नाविना कसे जगती ? ३५
‘ मध्यान्हीं क्षुत्पीडा कठिण नृपाळा ! असह्य तळमळ ती,
चाले कळे तुलाही जीवनकलहीं जनांत खळबळ ती. ३६
‘ नाना उपभोगाच्या वस्तु कशाला क्षुधार्थ अन्न खरें,
यास्तव आण कपोता फाडू दे या क्षुधातुरा नखरें. ३७
‘ तूं धर्मज्ञ ह्मणविशी ख्यात तुझें पुण्य कीर्तिच्या मखरा,
हरणें अन्न जनाचें हा नच का रे ? नृपा अधर्म खरा ! ३८
‘ क्षुत्पीडा सह्य न हे, माझ्या स्वकरेंचि, लावि फांस गळीं,
मी मेल्यावरि दुःखें मरतिल तीं बायका मुलें सगळीं ! ३९
‘ रक्षुनि एक कपोता करशिल तूं घात चार जीवांचा,

यास्तव ह्मणों नको तूं स्वमुखें राया ! ' कपोतजी वांचा. ' ४०
' ह्मणसी कपोतरक्षण धर्म असे परि अधर्म हा राया !
यातें रक्षुनि कैसें व्हावें तूं सज्ज मजसि माराया? ४१
' या पक्ष्याचें रक्षण करुनि मिळे अल्प पुण्य तें त्यजुनी,
मद्रक्षणेंचि जोडीं पुण्यार्णव; करिं विचार तूं अझुनी. ४२
' ये बाधा ज्या धर्मीं कुमार्ग तो, धर्म तोंचि बाध न ये—
ज्यातें, धर्मविरोधी ऐसा तूं सत्य धर्म साध नयें. ४३
' धर्माऽधर्माविषयीं गौरव लाघव मनांत आणोनी,
जेणें बाध कमी तूं आचरिं तो पुण्य धर्म जाणोनी. ' ४४

राजा बोले, ' श्येना ! धर्माचें वर्म शर्मकर वदसी,
वाटे धर्म कथाया आला धर्मज्ञ गरुड या सदसीं. ४५
' हें धर्मयुक्त भाषण, हा कोटिक्रम सुपंडितापरिस,
स्तुत्यचि, या जडलोहा तूं सांपडलासि पंडिता पारिस. ४६
' आतां सांग मला तूं शरणागत जो तयासि माराया—
देउनि, निंद्य जनीं मी होऊं कैसा विहंगमा ! राया ! ४७
' गोमृगवराह वा वृष शक्य तुझ्या हे खगा ! क्षुधाशमना,
जें मागशील तें घे होवो तुझिया न दुःख लेश मना. ' ४८

बोले श्येन, ' नृपाळा ! गोवृषमृग वा वराह हा श्येन,
सेवन करोनि लाजो, अभक्ष्यभक्षणकलंकहास्यें न. ४९
' श्येना कपोत भक्ष्यचि नेमियला ईश्वरें सदा जगतीं,
क्षुच्छमना आह्मांतें राया ! नाहींच जाण अन्य गती. ५०
' धर्माचें तत्व खरें नाहीं आलें अझूनि तुज कळुनी,
कदलीस्कंधासम निःसार असा धर्म काय आकळुनी? ५१

यास्तव सोड कपोता भोगाया फल विशंक कर्मांचें,
भय तूं लेश न मानीं हे नयनिपुणा! मनीं अधर्मांचें? ५२

बोले राय, 'श्येना! घे तूं शिबिच्या समृद्ध राज्यातें,
अथवा अन्य मनोरथ पुरविन वांछिशि खगेश्वरा! ज्यांतें. ५३
'जेणें हा शरणार्थी द्यावा लागे तुला न सांग मला,
ऐसा उपाय आतां सुविचारें तूं विहंगमा विमला.' ५४

बोले श्येन 'तुझें रे! प्रेम कपोतावरी जरी राया!
रक्षीं यासि दयाळा! अर्पुनिया आपुल्या शरीरा या. ५५
देईं कपोतभारचि निज तनुचें मांस आजि काढोनी,
सर्वस्वनाश नच हो बोलाचालींत वाद वाढोनी' ५६

बोले राय, 'अहाहा! मान्य तुझी ही खगेश्वरा आज्ञा,
देतों कपोतभारचि मांस तुला तोलुनी नयप्राज्ञा!' ५७
मग एक पारड्यांत स्वाश्रित खगतनु नृपाळ तो घाली,
निज तनुमांस दुज्यांतहि परि तें येई न पारडें खालीं. ५८

जड तो कपोत झाला वरिवरि जरि मांस राय तो टाकी,
ये न बरोबर कांटा श्येन वदे ये पलासि तोटा कीं. ५९

मग राय पारड्यांतचि बैसे परि राहिलेंच तें वरतें,
घाबरला नृप तेंव्हां बोले, 'मम हाय! हाय! यश हरतें. ६०
तनुंतुनि भळभळ वाहे रक्त न त्याची मला जरा परवा,
परि यश राहो, याचा न सुचे मजला विचार जो बरवा. ६१

रे! धांव धांव माझ्या दुस्तर या संकटीं जगत्पाला!
तुजवांचुनि यश माझें रक्षिल रे! कोण हरुनि तापाला. ६२
ह्या अल्प कपोताची तनु न तुळे माझिया शरीराशीं,
तेव्हां हें कपट कळे पुरविन परि आजि मी करारासीं. ६३
' जरि सत्य भक्ति माझी प्रभुचरणीं आज पारडें खालीं,—
येवो मांसाचें मज लाविल का देव पाहया खालीं? ६४
' माझा धर्म खरा जरि असेल तरि हा टळोनि हाकाटा,
येवो आजि घटाचा पुण्यबळानें बरोबरी कांटा.' ६५

संकल्प करुनि ऐसा लागे तुलसीदला शिवायाला,
वारी ता श्येन तया गद्गदवचनें सुधीर रायाला. ६६

बोले श्येन ' नृपाळा! भक्तिबळें जिंकिलेंस तूं मजला,
आतां पुरें पुरें हें साहस तव पुण्य हें असो तुजला. ६७
' भक्तिबळें तुळशिल तूं ब्रह्मांडहि भूपते! सकल कळलें,
प्रेमभरें हें माझें प्राणसख्या! हृदय आजि खळखळलें. ६८
' हा दिव्य देह राया करुनि तुझा यासि आजि मी जपतों,
भगवन्नामाचा तुज आजि फळाला खराचि ये जय तो. ६९
रे! हा कपोत अग्नि, श्येनहि देवेंद्र हाचि बा! राया!'
जिज्ञासेनें आह्मी आलों होतोंचि सत्व हाराया. ७०
' राया! प्रसन्न झालों पाहुनि परि धैर्य आजि हें अगळें,
आह्मीच काय तुजला धन्य ह्मणो विश्व आजि हें सगळें. ७१
' रविशशि जोंवरि तोंवरि कीर्ति तुझी उज्ज्वळा जनीं राहो,
तूं वंद्य त्रिजगांतहि पुण्यबळें नित्य दान--वीरा हो. ७२

'तव कीर्ति दुंदुभीचा जावो ध्वनि गर्जुनी दिगंताला,
साधन मंजुगिरेनें गाया हो हें चरित्र संतांला.' ७३
ऐसें वदोनि देउनि रुचिराशी इंद्रनाकलोकाला,--
गेला, स्वधर्म पाळुनि देई आनंद राय लोकांला. ७४

——————— विठ्ठल भगवंत लेंभे.

## *वर्षर्तुवर्णन.

श्लोक.

वधूनि, मग राघवें कपिवरास राज्यासनीं--
तदीय अनुजा स्वयें बसवुनी, नगीं राहुनी;
वदे जलद--काल हा सुखद लक्ष्मणा! पातला,
महीध्रनिभनीरदीं गगनभाग संव्यापिला. १

भानूच्या किरणीं समुद्रसलिल प्राशूनि द्युस्त्री धरी,
गर्भाला नव कार्तिकादि महिने संपूर्ण होतां खरी;
सर्व स्थावरजंगमात्मक जगत्संजीवना जीवना,
आतां लोक सुखार्थ ती प्रसवते वाटें असें मन्मना. २

अंभोदसोपानपरंपरांनीं,
व्योमीं चढोनी कुसुमावलींनीं;
शक्रार्जुनांच्या दिसते रवीस,
सोपे अलंकार करावयास. ३

संध्याराग--सुरंजितान्तरघन व्योमांगणीं दीसती,
अंतीं पांडुर वर्ण त्यावरुनि हें चित्तीं मला भासती;
सुस्निग्धव्रणबंधपट्ट वितत व्योमाचिये लक्ष्मण!
त्यांहीं बांधुनि टाकिले जणुं दिसे या अंबराचे व्रण ४

---

* प्रस्तुत वर्णन हें वाल्मीकिरामायणाच्या आधारें रचलें आहे.

वाहे मारुत मंद तोंच जणुं जें निश्वास टाकीतसे,
संध्याराग सुतैलपर्णिकरसे ज्या लेप केला असे;
नानाकारसितांबुदव्यतिकरें पांडुर्य आलें जया,
तें हें मारशरातुरासम दिसे आकाश मातें सया. ! ५

मेघानीं अपुल्या नवीन उदकीं आधीं बहू सेचिली,
सूर्याच्या मग तीव्र भानुनिकरीं संतप्त जी जाहली;
मच्छोकानलतप्तमैथिलसुता जैशीं टिपें गाळिते,
धर्मक्लिष्ट तशी समग्र अवनी बाष्पासवें ढाळिते. ६

मेघोदरांतुनि झराझर होति मुक्त। कर्पूरलिप्तदलतुल्य उदंडशीत,
प्रावृड्ऋतूंत अजि केतकगंधमंत। प्यायास अंजलिनि शक्य समीर होत ७

प्रोत्फुल्ल अर्जुनमहीरुह जेथले हे,
झाले जयावरति केतकगंध वाहे;
धाराजलीं गिरि तसा अभिषेकिजेतो,
शांतारि शूर कपिराज जसा पहातो. ८

वार्धारा उपवीत अंबुद असे ज्यांचें कुरंगाजिन,
वातापूरित गव्हरांतुन निघे ज्यांच्या गभीरस्वन;
ऐशा या अवनीधरा निरखुनी वाटें मला कीं असें,
वेदांच्या पठनास विप्रबटुंनीं आरंभ केला असे. ९

ओवी.

विद्युद्रूपीं सौवर्ण कशांनीं। ताडितां गगनालागोनी,
आंतुनि निघे जो मेघध्वनी। जणों आकाश ईवळे. १०

दिंडी.

नील मेघाश्रित वीज चमकणारी। मजसि भासे कन्याच ही बिचारी–
जनक राजाची, रावणाचिंये अंकीं। जणों बसली निष्पापिणी विलोकीं ११

साकी.

कामिजनांना सुखकारक ह्या दिशा जाहल्या सकल,
पूर्वपश्चिमादिक नोळखती झाले विरही विकल. १२
जणों घनांचा सर्व दिशाला केला आहे लेप,
निशाकरादी ग्रह झाले कीं विनष्ट आपोआप. १३
कोठें कोठें बाष्पोष्म्यानें आवृत झाले कुटज,
वर्षागमनें सहर्ष पुष्पित गिरिसानूवरि आज. १४
जनकसुतेच्या शोकाग्नीनें फार जहालों तप्त,
सौमित्रा ! हे मदनवन्हिला हृदयीं करिती दीप्त. १५

श्लोक.

धूली गेली सकळ निघुनी वाहती शीत वात,
उष्णर्तूचे सकलहि तसे दोष झाले प्रशांत;
झाल्या यात्रा अवनिपतिच्या स्तब्ध येती स्वदेशीं,
भार्येच्या जे विकल विरहें जाहले ते प्रवाशी. १६

साकी.

मानस नामक रम्य सरोवर आहे तेथें जावें,
आपआपल्या प्रियासंगतीं घेउनि तेथ रहावें. १७
ऐशा लोभें निघुनी गेले चक्रवाक खग सारे,
कवण राहतो कान्ताविरहित वर्षाकालीं बा ! रे. १८

श्लोक.

वरिवरि पडुनीया वृष्टिचें वारि झालें,
उखर विखर भारी मार्ग त्यांतून चाले;
रथ तुरग न कोणी मर्त्य ही सर्व ठायीं,
चिखल बहल झाला आजि सोमित्रि ! पाही; १९

सौमित्रा ! गगनीं जरी पसरले सर्वत्र अंबोधर,
कोठें रिक्त दिसे क्वचित् स्थलिं घन स्वाच्छन्न हें अंबर;
जैसें पर्वत सन्निरुद्ध दिसती, कोठें प्रशांताब्धिचे–
आलें रूप तसें नभास अजि या, ऐसें मनांला रुचे. २०

कदंबसर्जपुष्पयुक्त नूत्नवारि जाहलें,
तयांत धातु शैल ज्यांत मिश्रणासि पावले;
ह्मणोनि ताम्र वर्ण ज्यास फार आप्त जाहला,
अशा वहाति शैलजा पहा जवें नद्या जला. २१

भुंग्यापरी असितवर्णचि दीसताती,
जंबूफळें सरस ही जन भक्षिताती;
भूमीवरी पडतसे पवनावधूत,
हें आम्र पक्कफल जें बहु रंगयुक्त. २२

ज्यांचा केतन चंचला सुरुचिरा माला बलाकावली,
ज्यांची आकृति तुंग शैलशिखरा संकाशसी जाहली;
उन्मत्तद्विपतुल्य नाद करिती अंभोद हे भैरव,
वाटें संगरिं ठाकले मज उभे उन्मत्त हस्ती नव. २३

वर्षोनी वारि भारी मुदितनिकारिं हीं शाद्वलें पुष्ट केलीं,
ज्यामध्यें रम्य नृत्योत्सवहि कारितसे हर्षिता बर्हिणाली;
मेघानीं वृष्टि केली अतिशयित जयामाजि ऐशीं वनें हीं;
शोभा देती त्रितीय प्रहरिं अधिकशी लक्ष्मणा ! नीट पाहीं. २४

भेटावया आलि नवांबुदाला । हर्षाकुला चारु बलाकमाला,
ही श्रेष्ठ वाटे सितपंकजांची । मालाऽमला लांबचि अंबराची. २५

अपूर्ण.

धूर्जटी

———————

## *अभिनंदन.

श्लोक.

होतां कालवशें प्रगाढ तिमिरें संव्याप्त सारी धरा,
येतो कोमलरश्मिदीप्त सहसा धावून दिव्यारुण;
नैदाघप्रखरातपें सुरधुनी जाणार जों आटुनी,
तों हैमाचलशीतलांबुलहरी वेगें तिला भेटती. १

झालें अंबर शून्य निष्प्रभ, रवी होऊन अस्तंगत,
त्याला हांसवि इंदु शांत मधुर स्वीय प्रकाशें पहा;
कोऽप्यंभोधरवर्धिता वनगता दावाग्निदग्धा लता,
ती उज्जीवित जाहली अजि खरी नव्यांबुवाहागमें. ! २

वर्णावें तव शुष्कशब्दनिवहीं कैसें यशोगौरव,
शून्यांतीलच सृष्टि आज उदया आली प्रभावें तुझ्या !
ही दुर्दैवशताभिघातदलिता वैधव्यपंकांतुनी,
धैर्यें उद्धरिली तुवां गुणवती बाला यशोमंडिता ! ३

हास्याला हंसवावयास जगतीं कोणा नको सांगणें,
पूर्णेंदू डुलतांहि अंबारें पुन्हां येतात तारे किती !
सौख्यानंद–विवर्धनास असती उद्युक्त सारे जण,
पाथोधीवर वर्षणार दिसती थोडे न अंभोधर ! ४

ज्यांना सोडुनि दैवदुर्विलसितें गेलीं सुखें सर्वहि,
ज्यांचीं दारुण लोचनांबुतटिनीपूरीं बुडालीं शुभें;
ज्यांच्याभोंवति गाढ पूर्ण भरलें निर्विण्णतेचें तम,
निंदायास तयांस मात्र सहसा निर्लज्ज येती पुढें ! ५

---

* कवीनें आपल्या एका मित्राच्या पुनर्विवाहप्रसंगीं हें अभिनंदन केलें आहे.

मूढांनीं अविचारुनी पसरिलीं निर्बंध वाग्जल्पनें
झाला निष्ठुर धर्म, पातक रची तोही निसर्गावर,
अश्रूंचा प्रबलौघही, शमविण्या हा हट्ट, झाला वृथा
धिक्कारून मृदुत्व, निष्ठुर मनें अस्निग्ध केलें जगत्! ६

जीं कांहीं विकतात आज ऋषिंच्या नांवावरी दुर्मतें
तीं त्यांचीं ह्मणण्यास लाजच बरें वाटेल कोणासहि!
सोंगें घेउनि गोड, गोंधळ पुरा केला वृकांनीं मधें
त्यांचा फोलपणा पुराच पटतो आतां विचारी मना! ७

जी झाली परि हीन संस्कृति असे सामान्य लोकांवर
सर्वांचीच तिच्यामुळें दिसति कीं झालीं मनें दुर्बळ.
धैर्याचे तुजसारखे नरमणी व्हावेत याया पुढें
दुःखाचा लवलेशही हत जगीं राहील कैसा मग? ८

होतें पूर्वीं कसें--विचार करुनी कांहीं नसे फायदा
व्हावें काय पुढें--पुढें धरुनियां हें ध्येय चाले बुध.
येतां चारु नव प्रभात पसरे सर्वत्र दिव्य प्रभा
तेव्हां काय तमोविचार करितो कोणी विवेकी नर? ९

केले जे अविचार पूर्वज जनीं ते क्षम्य माना सुखें,
आल्या चालत अंधरूढि भलत्या त्यांची करा कींवही
धैर्यानें परि मोह सारुनि दुरी निंदेस धिक्कारुनी
त्यांचा नाश करून उन्नतिपथ स्वीकारिला पाहिजे. १०

बोलोनी कितिही निरर्थचि असे सामान्य लोकांस तें
रूढीला दृढ रूढिनेंच सुजनीं बा! पाहिजे जिंकिलें.
मोठे ग्रंथ रचून आज कितिसा होणार तो फायदा?
यावे हेच खरें तुझ्यासम पुढें उत्साहशाली युवे! ११

वृद्धांच्या कटु निंदनोक्ति उडुनी जातील वाऱ्यावरी
आहे हें जग सत्य सत्य अपुलें, या या युवे हो चला !
धैर्याचा ध्वज अंबरीं फडकत स्वच्छंद राहो अतां
न त्रेतायुग–काल सांप्रत असे, भीऊं नका लेशही ! १२

सारे निर्दय कायदे स्मृतिंतले ते दूर फेंका सुखें
हल्लींचे स्मृतिकार आपणच हें ध्यानीं असूं द्या पुरें
भावी काल समस्त आज तुमच्या हातांत आहे खरा
भावी सृष्टिहि खास खास तुमच्या नाचेल शद्बावरी १३

न्याय, प्रीति, समत्व, शांति जगतीं नांदावया सर्वदा
यत्नें आजच गाढ रोपण करा सर्वत्र सद्भावना
कालें वाढुनिया प्रचंड, भुवन व्यापून टाकोत त्या
त्यांच्या स्वादुफलप्रसूननिकरें आच्छन्न होओ धरा ! १४

———— रेंदाळकर.

## राजा आणि कवी.

### श्लोक.

पुष्पें अर्पिति आपुलीं तरुलता प्रेमें वसंताप्रति,
इंदूला निज रम्यहास्य कलिका दे तारकांची तति;
गाणीं मंगल दिव्य निर्झर वनीं ईशास गातो सुखें,
तैसा मी कवि अर्पितों तुज नृपा ! हीं काव्यसन्मौक्तिकें ! १

भारद्वाजविहंग गाय अपुलीं गाणीं वसंतांतरीं,
दिव्यानंदभरें सुपुष्पखचितां माकंद कुंजां भरी;
तैसा मीहि नृपोत्तमा ! तुजकडे ही गान मुक्तावलि,
आलों घेउनि ठेवितों तिस मुदा त्वत्पुण्यवक्षःस्थळीं. २

दिव्यत्वासहि तूं ललाम जगिं या आहेस भूपा ! खरे,
शोभा ती तुज आणणार कसली हीं काव्यपुष्पें बरें ?
हे राजा, परि त्यांस येइल नवी शोभा तुझ्या संगमें,
आनंदें हंसतात कैरवकुलें सुस्निग्ध चंद्रागमें ! ३

प्रेमें वाङ्मयदेवतेस अपुला तूं कोश संतर्पिला,
हें सारें मनिं आणुनीहि कवि हा त्वत्संनिधीं पातला;
नीलांभोधर वर्षला तरि पुन्हां त्यालाच संप्रेक्षुनी,
मोदें याचिति नीर चातक, न ते त्या शारदांद्वा वनीं. ४

पुण्यात्मे नृप भोज मुंजनृपही स्वर्गीं सुखें नांदती,
तत्कीर्तीपरि कालिदासकविता गाते इथें संप्रति;
अर्वाचीन कवी, तुझी शुचियश:सौगंध्यपुष्पें तसें,
प्रेमें गुंफुनि ठेवितील ! तुज हें मी सांगणें कायसें ? ५

माझीं काव्यसुमें नृपा ! तुजकडे आलीं पहा हांसत,
लाभो त्यांस तसेंच कौतुकभरें त्वद्दिव्यमंदस्मित !
पुष्पांची मृदुता कितीक असते, तें काय मी सांगणें ?
राजा ! तूं अपुल्या रसार्द्र हृदयीं त्यांलागिं संगोपणें. ६

नागेश

---

## संघकार्य.

### श्लोक.

बिंदुनें बिंदुनें होतसे सागर,
जो महाही प्लवा होतसे दुस्तर;
मृत्कणें मृत्कणें होतसे पर्वत,
शेकडो योजनें जो असे विस्तृत. १

पेशिनें पेशिनें होतसे पिप्पल,
स्पर्शितो जो शिरांनीं नभाचा तल;
तंतुनें तंतुनें रज्जु होई महा,
रोधिते जी मदोन्मत्त हत्ती पहा. २

क्षुद्र एकामधें एकही घालुनी,
होतसे थोर संख्या परार्धाहुनी;
सानुले सानुले भाग जो जोडितो,
कार्य कालें प्रचंड स्थिर प्रेक्षि तो. ३

ज्ञान ह्या रीतिनें मेळवा बाल हो!
यत्न न स्तब्ध, वा भग्न आशा न, हो.
थोडकें थोडकें ज्ञान संपादुनी,
धन्य व्हा ज्ञानवृद्धार्चना लाहुनी. ४

——————— विद्याधर वामन भिडे बी. ए.

## अपयश.

### श्लोक.

यशास मळ लागल्यावरि न होइ तें निर्मल,
प्रयत्न मळधावनीं सकल होति ते निष्फल;
समुद्रजलबिंदुनें मधुरता पयाची सरे,
न ती मधुरता पुन्हा मधहि ओतल्यानें भरे. १

विनष्ट यश नाणवे परत जीव गेला जसा,
प्रयत्न कितिही करो मनुज, होइ तो शुष्कसा,
जगांत खल शेकडो असति, ते यशोधावन—
घडो कधिं न देति, कीं मलिन मत्सरें तन्मन. २

प्रमाद न घडो, न वा अयश हो जगीं आपलें,
अशी सतत काळजी सकळ लोक घेती भले
रमो न तुमचें अघीं मन, असो सदा निर्मल,
समर्थ न तुह्मा उपद्रवहि होत द्याया खल. ३

——————— विद्याधर वामन भिडे बी. ए.

## श्रीमत्स्वामी रामतीर्थ यांचा शेवटचा लेख.

### श्लोक.

“ब्रह्मा! विष्णु! महेश! इंद्र! गिरिजे! मृत्यो! प्रभो भारता!
आतां घेउनि जा मदीय तनु ही, निःशंक, प्रेमांकिता
या विश्वांत असंख्य सुंदर तनू आहेत प्रेमोदधी
चिद्रूपीं बहुलीं वसेन नटुनी आतां दिगंतीं कधीं १

नेसोनी नव चंद्रिका–पट कधीं शीत स्वयें मी मुदा
वा सौवर्ण रवीकरांशुकिं कधीं राहेन ही सर्वदा
ओढे सुंदर वाहती गिरिंत जे काढीत मंजुस्वन
स्वच्छंदें विहरेन मी नटुनिया तद्रुपिं सारा दिन २

कोठें नाचति त्या सुरम्य सरिता गुंगूनिया गायनीं
तद्रूपीं विहरेन वा कधिं अतां शांत, प्रमोदें, वनीं
होवोनी लहरी करीन कधिं मी नृत्या समुद्रांतरीं
वायू मंद सुगंध शीतल कधीं होईन विश्वावरी ३

राहे दिव्य अनंत रूपिं जरि मी “एकैक” आहे तरी
रूपें सर्व मदीय! विश्व सगळें राहे मदीयांतरीं
खालीं येउनि भूवरी पसरिलें स्वानंद–साम्राज्य तें
केलें जागृत निद्रिता; सजिव ही तैसें मृतातें स्वयें ४

केंव्हां हांसविल्या मृदूल कलिका हांसोनि त्यांच्यासवें
केंव्हां बुल्बुल पक्षि मी रडविले विश्वावरी हिंडुनी
सत्य–प्रावरणीं किती मम करीं आच्छादिलें प्रेमळ
मायेचा पट दूर सारुनि, दिला स्वानंदधी उज्ज्वल ५

दिव्यात्मा नच होइ बद्ध कधिं ही ! झाला न ! होईल ना !
प्रेम ! प्रेम बनोनि मूर्त तुरवी विश्वाचिया अश्रुनां
देशोदेशिं वनीं जनीं फिरुनिया सर्वांसही छेडुनी
गेला ! ‘ राम ’ विलीन होउनि पहा ! विश्वांत प्रेमस्वनीं ” ६

गिरीश.

---

## कोकिलान्योक्ति.

### गीति.

माधुर्य कोकिला ! तव वाणीचें सहज भासतें न मला;
त्यां लाधतांचि, पक्षा ! त्यागिसि कीं पोशिलें जिहीं तुजला ! १
माकंद–तरुशिरावरि वसणारे विहग शेंकडों असती;
आस्वाद मंजरीचा समजे परि एक कोकिला जगतीं. २
हे ! बालकोकिला ! तूं लीलेनें चिर वसोनि सहकार–
वृक्षीं; न लाजसी ! कां त्यागुनि त्या आजि सेविसी इतर ? ३
कलकंठा ! तव वाणी होई मंजुल, वसोनि सहकारीं;
होईल काय तेवीं खदिरपलाशावरी मनिं विचारीं. ४
कर कोकिला ! पुरे तव कलआलापांस; काय सहकार–
शोधिसि ? भात्यांत भरुनि शरसंघा संचरे स–धनु शबर. ५
स्मरसी न काम मंदिरिं जें त्वां उपभोगिलें परभृता ! तें.
सहकारकुसुमसमयीं; आतां कां कारिसि थोर रावातें ! ६

धरि मौन कोकिला ! जों जलधरसमयीं असे मही लोला;
कुटजकदंब विकसतां, वक्ते होतात भेक ते, बाळा ! ७

भामासुत.

## दिव्य गान.

पद.

( चाल:– हा हाय ! कन्यके० ! )

निशिदिनीं जयाचें वेड लागलें भारी
तें गान ऐकतों दिव्य, रुचिर, सुखकारी ॥ ध्रु० ॥
मृदुतीव्र चहुंकडे निघती ज्याचे सूर
स्थिरचरीं, भूदरीं, वरी, अंबरीं दूर
हें हीन, कृष्ण, सुकलेलें
हें शुभ्र, नवें खुललेलें
हें शांत, शुद्ध, नमलेलें
हा भेद न ज्या, जें सृष्टी व्यापी सारी
तें गान ऐकतों दिव्य, रुचिर, सुखकारी १
नव पुष्पासंगें गातें पिकलें पान
पिक गातां मारी तान सवें उद्यान
जननीची ‘ जो जो ’ गाणीं
गातसे शिशूची वाणी;
खाणीस सूर दे पाणी
मणि ‘ सा ’ ह्मणतां ‘ री ’ कोळसाहि उच्चारी
तें गान ऐकतों दिव्य, रुचिर, सुखकारी २
दिन गातो, गाते रात्र, तारका गाती
गातात इंद्रधनुमेघ विजेसांगातीं

प्रति पदार्थ लागे गाया
ती गाते त्याची छाया
गायकचि गान ऐकाया
मजमधेंहि उठवी तरंग जें निर्धारीं
तें गान ऐकतों दिव्य, रुचिर, सुखकारी ३

सुमंत.

## तूं ही भिकारीच !

[ खुलासा. पुणें येथें प्रसिद्ध होणाऱ्या चित्रमयजगत् नांवाच्या सर्व विश्रुत मासिकांत रा. रा. कृष्णाजी गोविंद किनरे हे ' रामकृष्ण वाक्सुधा ' नांवाचा सर्वोत्तम ग्रंथ क्रमशः प्रसिद्ध करीत असतात. त्यांत वाक्सुधेचा जो भाग आला आहे, त्यांतील एका सुंदर गोष्टीचा प्रस्तुत कवितेस आधार घेतला आहे. ]

आर्या.

दिल्लीसमीप पूर्वीं निर्जनगहनाटवींत उटजांत,
होता यतिवर कोणी धर्मात्मा ईशभक्त विख्यात. १
अनुकूल सर्व होतें शांतीच्या त्या निकेतनामाजी
खिन्न परी तो चित्तीं न कळे त्या दुःख कोणतें भाजी. २
हिमकालशीत वारी तापुनि बहु मंद मंद तो तपन,
उष्ण हराया मारुत वीजी त्या होउनी स्वयें व्यजन. ३
पळते पुत्र गिरीचे घडविति त्या मधुर शीत जलपान,
वृक्षलता आनंदें देति तया स्वादु रम्य फलदान. ४
शय्या मृदुल धरित्री दिग्वसनें रम्य पांवरायाला,
होतें कुटुंब ऐसें सिद्ध सदा साह्य त्या करायाला. ५

गर्भश्रीमंती ही निरुपम पाहोनि साधुरायाची,
मात्सर्यानें व्हावी विचलित बुद्धीहि खास धनदाची. ६
येती बहु जन तेथें संतत त्या संतदर्शनाला हो !
इच्छूनि कीं घडावा सत्संगाचा पवित्र हा लाहो. ७
भगवन्नामश्रवणा निष्कामत्वें असंख्य जन येती,
येती तसेचि कोणी वांच्छा कांहीं धरोनिया चित्तीं. ८
कोणी आस धनाची विद्येची मुक्तिची धरी कोणी,
कांतेच्छेनें कोणी छिद्रान्वेषण करावया कोणी. ९
' अपुल्या करीं घडावा आदरसत्कार आगतांचा या, '
वाटे असें निरंतर साधूच्या परम शांत त्या हृदया. १०
अभ्यागतसुस्वागतचिंता ही त्या सदैव जाळितसे,
कारितो काय परी तो गांठीं त्याच्या कपर्दिकाहि नसे. ११
शरदीं गगनीं जैसे उठती घन बहु परी लया जाती,
तेवीं दीनमनोरथ उपजति जैसे तसेचि मावळती. १२
केला विचार अंतीं त्यानें ' सकरुण नृपाकडे जावें,
सादर शुद्ध मनानें स्वांतींचें शल्य हें निवेदावें. ' १३
आला विचार ऐसा नैस्पृह्यें परि तया न मानवला,
झालें दुःख अमितही सहसा जणुं दंश वृश्चिकें केला. १४
' जा ' कथिलें एक मनें ' नच जाईं बा ! ' सवेंचि दुसऱ्यानें,
' जा ' कथि पुनरपि पहिलें ' अवमान कशा ? ' दुजें ' स्वहातानें. ' १५
झालें मनिं तुमुल असें निर्णय कांहीं परंतु होई ना,
जावें वा नच जावें काय करावें तयासिं समजे ना. १६
भ्रुकुटीस भाल भेटे पावे दृष्टी सवेंचि संकोच,
निमिषीं अर्धोन्मीलित निमिषीं पावे विकास तैशीच. १७
अंगुष्ठतर्जनींनीं हनु चोळी नेत्र घेउनी मिटुनी,

दावुनि चाले क्षणभर चोळी शिर अधर चावुनी रदनीं. १८
गगनीं सदनीं देहीं क्षणैक दृष्टि स्वकीय फिरवोनी,
सोडी दीर्घ उसासे स्वस्तिकवत् हृदयिं हस्त ठेवोनी. १९
जावें उटजांतोनी थांबुनि मध्यें क्षणैक परतावें,
यावें गृहीं बसावें विचार करुनी पुन्हा परत जावें. २०
आंदोलनीं अशा या झाला निश्चय तया महात्म्याचा,
मानापमान सारा सोडुनि दिल्लीपुरीस जाण्याचा. २१
जडपदिं उटज त्यजुनी गेला तो साधुराय मानधन,
भेटुनि साम्राटातें आणाया लाभल्यास कांहिं धन. २२
जातां प्रासादीं तो गेला भूपाळ संनिधानिं मुनी,
नृप पाहतां तयाला खुणवि बसाया मृगाजिनीं नमुनी. २३
एकाग्रमानसानें होता भूपाल अर्चनीं निरत,
देवायतनीं अपुल्या सादर करुणाघनासि आळवित. २४
' काला ! कालातीता ! कालक्रीडा ! करालकरवदना !
कमनीया ! करुणेशा ! कारुण्यास्पदजनीं करीं करुणा. २५
' सम्राडधीश बा तूं पुत्र तुझा वंदितों तुला भावें,
कीं त्वत्कृपाप्रसादें याहुनि मज अधिक वित्त लाभावें. २६
' दे मज ऐश्वर्य विभो ! अतुल, करीं बालकामनापूर्ती,
वाढो कीर्ति दिगंतीं श्रवणिं पडो ही मदीय आर्तार्ती. ' २७
परिसुनि सम्राटाचें ईशोपासन निघे त्वरित जाया,—
तो साधु तों वदे नृप ' आलां भो ! कोठुनी अगारा या ' ? २८
अपुला आगमहेतू कथिला त्यानें करोनि मधु हास,
वदला नृपति तदा त्या ' जातां कां ? पुरवितों बसा आस. ' २९
निस्पृह साधु वदे तो ' तूं ही बा ! मजसमान याचक रे !
' जो तूं स्वयेंचि पसरिसि कर इतरां देशि काय त्याच करें ! ३०

' जो तूं स्वयें भिकारी त्या तुजला मागुं मी तरी काय?
दात्यांच्या दात्यातें आळवितां श्रेय कीं बहुत होय. ३१

अनंततनय.

---

## गंगास्तुति.

### श्लोक

देवी! जगज्जननि! जन्हुसुते! नमस्ते,
कल्याणकारिणि, असो प्रणती पदांतें;
भक्तार्तिहारिणि, नमोस्तु नमो शुभांगे,
गंगे! जयोस्तु, नत--संसृति--ताप--भंगे.! १

त्वद्दर्शनें मन पहा अतिशांत होय,
देवी! भवानल महा शमवीत तोय;
पापी कितीक तरती तुझिया सुसंगें,
गंगे! जयोस्तु नत--संसृति--ताप--भंगें! २

देवी! जगन्मन--विमोहिनि! हें त्वदीय
वारी हरी दुरित देव--मुनींद्र--सेव्य;
माते! सुरम्य दिससी रुचिरें तरंगें,
गंगे! जयोस्तु नत--संसृति--ताप--भंगे! ३

गे! धन्य अच्युत--पद--च्युत हें सलील,
प्रेमें शिरीं धरित धूर्जटि जें स--लील;
जें सेविती सतत निर्जर सानुरागें,
गंगे! जयोस्तु नत--संसृति--ताप--भंगे! ४

न्हाया सुशांत अति--तीव्र विष--प्रदाह;
माते! सुशीतल सुरम्य तव प्रवाह;

गे शंकरेंहि धरिला अतिउत्तमांगें,
गंगे ! जयोस्तु नत--संसृति--ताप--भंगें ! ५
त्वत्तीरवासि कृतकृत्य शुकादि पक्षी;
स्तोत्रें तुझीं सतत गाति बसून वृक्षीं
पक्षी--कदंबहि जिच्या स्तुतिगानिं रंगे,
गंगे ! जयोस्तु नत--संसृति--ताप--भंगे ! ६
हे वृक्ष वेलिगण हो, गणना नव्हे कीं,
पुण्यास या तुमचिया गमतें त्रिलोकीं;
गंगांबु--बिंदु मिळती नित वातसंगें,
गंगे ! जयोस्तु नत--संसृति--ताप--भंगे ! ७
तीरीं शिला--तळिं बसें पुलिनीं जईं मी,
होतें सुसौख्य बहु जें न विराम--धामीं;
हा शीत वात करि पूत पहा ममांगें,
गंगें ! जयोस्तु नत--संसृति--ताप -भंगे ! ८
माते ! तुझाच सहवास सदा घडावा,
हेतू अशाश्वत सुखांत मुळीं नसावा;
व्हावें तुझ्या चरणिं लीन मदंतरंगें,
गंगे ! जयोस्तु नत--संसृति--ताप--भंगे ! ९
गंगास्तुती पठण नित्य करील त्यास,
संसार--ताप न कधींहि घडेल खास;
जाती लयासि षडरी तिचिया कृपेनें,
भक्तार्ति सत्वर पहा जननी लया ने. १०
हे जन्हुनंदिनि, तव स्तुतिरूप साचा, । ग्यां हार हा बनविला दशमौक्तिकांचा;
माते! समर्पि तुजसीं बहु भक्तिभावें,। शोभे कसा तिजसि? सज्जन हो वदावें. ११

---

बुध.

# काव्यरत्नावली.



## अंक ५ वा.

## श्रीहनुमच्चरित.

### षष्ठम शतक.

आर्या.

श्रीसद्गुरुपरमात्मारामसरूपीं अभेद हनुमंत,
तो प्रथम वंदुनी गतशतककथा चालवीत यशवंत. १

रघुनाथसत्कृपाधनभांडारी संत भक्त हनुमंत;
निजचरितें रामयशोधनवर्धन कारि सदैव मतिमंत. २
मार्गीं परत निघाला रघुपतिदशमुखबलाबल स्वमनीं--
तोलुनि वदे, दशमुखा! रघुकुलपतिवीर्य सर्वथा न मनी. ३
सद्भक्तसैन्य इकडे लंकापतिची अभक्त सेनाही,
निशितशरें श्रीरामा दग्ध कराया विलंब लव नाहीं. ४
भक्तांचा कनवाळू न वधी स्वकरें कदा स्वभक्त रणीं,
करितां वधोद्यम दुजा स्वांगें रक्षीतसे अशी करणी. ५
लंकापती सबल निजबंधुबिभीषणबळें असे खास,
विषफळ न वाढ घेतें नख लावावें तदाच डेंखास. ६
फसलों प्रथमचि पाहुनि दांभिक जन मानिले सुभक्त असे,
फसलों पुन्हा बिभीषणसदनीं मानूनि भजन दांभिकसें. ७
हरिभजनीं मन तल्लिन नाचे हरिरंगणीं सदा रमुनी,
नाचवि बघल्यांतेंही प्रेमभरीं तो गमे सदार मुनी. ८

त्यातें प्रथम परीक्षुनि संबंध रघूत्तमासि जोडावा,
मोडावा संशयतरु मनिंचा मग हा प्रदेश सोडावा. ९
अधमाधम सेवक जो कार्य न कारितां त्वरें फिरे मागें,
अधम कथित कार्य करी हित अधिक न करुनि वेतनें मागे. १०
सुचला उपाय चित्तीं हर्षे बलभीम वाजवी टाळी,
ध्यानीं आणुनि कोमल ह्रदयीं श्रीराममूर्ति कवटाळी. ११

झाला अदृश्य कपि तो वाढविलें ब्रह्मपुच्छ विपुलपणें,
आडविलें पथिं असुरां त्या भेणें भाग जाहलें लपणें. १२
घाली गवाक्षमार्गें ओढी बांधोनि दैत्य भवनस्थ,
भूमीवरी धडधडां आपटि होते कितीक निद्रिस्त. १३
सस्त्रीक किती निद्रित रतिसुखलोलुप किती मदनदास,
श्रीमुखचुंबकही पथिं ओढी आलिंगितेहि प्रमदांस. १४
होतां प्रभात किति ते शौचमुखक्षालनादि साराया,
उठती अडखळती बहु यत्न कारिति पुच्छविघ्न वाराया. १५
मागें पुच्छ पुढें बहु पळती आक्रंदती महावीर,
शिरला व्यालभयानक ह्मणती; करिती वधावया धीर. १६
मोडे शस्त्र, तुटे ना रोमहि, झाले हताश ते सारे,
भयभीत हांक देती, घे ह्मणती त्वरित धांव अमरा! रे. १७
गृहगोपुरीं लपति तयां राजपथीं पुच्छ शोधुनी ओढी,
पळति तयां माघारें लागे बांधोनि आपटी झोडी. १८
पुच्छाग्रीं बांधुनियां कितियेकां गगनिं उंच भिरकावी,
जमती बहुजन जेथें तेथें कपिराज पुच्छ शिरकावी. १९
घाबरल्या नरनारी न कळे कोठें कसे निघे पुच्छ,
वदती परस्परांतें लंकानगरींत या जिणें तुच्छ.! २०

गृह सोडुनि पळति पुढें रोधी पथ पुच्छ पर्वताकार,
फिरतां गृहीं शिराया द्वार निरोधी करी बहु कार. २१
नगर सकळ आक्रमिलें कोठेंहि न राहिला रिता ठाव,
कोणी कोणास्तव हा वदती न कळेचि साधिला डाव. २२

चरफडती तडफडती धडपडती रावणास कळवाया,
ज्ञाते वदति दशमुखा! रामाची काढिलीस कळ वाया. २३
राजद्वारीं बहुजन बोंब करित चालले जसे शलभ,
कपि निजपुच्छ निवारी कीं माराया समूह बहु सुलभ. २४

विनविति दशकंठातें प्रलय करी पुच्छकेतु आटोप,
तंव आपटिलें बहुतां नृपाशिरिंचा पाडिला महा टोप. २५

तेथोनि गुप्त झाला गेला पुनरपि तया अशोकवनीं,
व्यवसायमग्न झाले नित्यापरि दनुज आपुल्या भवनीं. २६
घेउनि वदे विसावा या कपिचा मार रावणा सोस,
सीताश्रयनगविरहित सकल करी मग अशोकवन वोस. २७

वनरक्षक माराया येति तयां आप--आपटोनि वधी,
भ्याड करिति यत्न परी पुच्छ न दे त्यां पळावया अवधी. २८
सहसैन्य जंबुमाली कपिनें एका क्षणांत निर्दळिला,
दैत्यक्षयार्थ समजुनि उमजुनि हें मूळ काढिलें कळिला. २९

वधिले रक्षक केला चैत्यप्रासाद चूर्ण वज्रकरें,
कळतां असुरपतीनें पाठविलें दैत्यसैन्य कोपभरें. ३०

कपिकुलमणिकोपानल दग्ध करी तेंहि वृत्त परिसोनी,
क्रोधाकुल दैत्येश्वर प्रेषी सहसैन्य पंच सेनानी. ३१
लोहार्गळा प्रखर–यमदंडसम करीं धरी रणीं हरि तो,
नाटोपे असुरवरां अवघा सेनासमूह संहरि तो. ३२

चतुरंग सैन्य देउनि दशमुख सप्त प्रधानसुत धाडी,
घालावया कपिवरी धांवति सायुध ससैन्य ते धाडी. ३३

प्रासादाग्रीं बैसुनि पवनतनय वांकुल्या तयां दावी,
शेष शिणेल दशशतें ती कृति एका मुखें किति वदावी. ! ३४
शस्त्रप्रहार चुकवी तेंच उलट फेंकिल्यावरी टाकी,
शरघातें कपिदेहीं दनुज महावीर लाविती टाकी. ३५

काळव्याल तसे प्रतिरोमीं शररुतति ते सकल सोशी,
दावानलसा उतरे दानवसेनासमुद्र तो शोषी. ३६
मंत्रिसुतांतें चरणीं धरुनि रणीं आपटोनि यमसदनीं--
पाठवुनी, जयजयरघुवीरजय कपीश जय वदे वदनीं. ३७

वृत्तांत सकल कळला कोपें जळला कृतांतसा गमला,
पाहुनि अक्षय वदला ताता ! जाया रणांत सांग मला. ३८
मी जितचि आणितों कपि सत्वर बांधोनि आपदापाशीं;
येइन आशीर्वचनें विजयश्री वरुनिया पदपाशीं. ३९

उठला त्वरें निघाला रणदुंदुभि वाजवी नभीं मानें,
परि हतदर्पचि केलें सैन्य बुभुःकार करुन भीमानें. ४०

गर्जुनि वदे मदांधा! करितों रणिं अक्षया! तुझा क्षय मी,
मद्बल खचित नसे त्या प्रलयानलतप्तलोहिताक्ष यमीं. ४१
घोरमहामुद्गरधर हनुमंतें गगनिं उडविलें रिपुला,
मुद्गरघातें वधिलें बलहि तसें श्रम न मानुनी वपुला. ४२

सुतनिधनदु:खितें दशकंठें आरंभिला महा नाद,
सांत्वन करुनि तयाचें नमुनि रणीं चालिला महानाद. ४३

करुनि पुरश्चर विधिला कैसा हा त्वां वदे कपि स्त्रजिला,
एकाकी चमु वधितो स्वप्नीं अपयश न ठाउकें जीला. ४४

कर जोडुनि विधि विनवी बलवंता! शांत हो पुरें समर,
मजकारणें दयाळा रिपुला यश दे भलेपणें न मर. ४५
ना तरि मज विप्राची निष्कारण उपटितील हे दाढी,
शेंडीस लागली कळ घोर विपत्पंकमग्न वर काढीं. ४६

बहु कोपला कपीश्वर पर्वत उचलोनि आणिला त्वरित,
इंद्रजितहि शरघातें चूर्ण करुनि कपिस गगनिं आवरित. ४७
धरिती परस्परांतें भूमीवरि फेंकिती परि न पडती,
मुष्टिप्रहार चुकविति अन्योन्यांतें वधावया घुडती. ४८
न मरेल निजकरीं हें जाणुनि सेनासमूह कपि रगडी,
भीमभयानकरूपें; इंद्रजितहि वदत धन्य वीर गडी. ४९

टाकी पाश धराया सूक्ष्माकारें निघोन कपि जाये,
लघुपाश योजितां तो भीमभयानकपणेंचि न समाये. ५०

अस्त्रेंहि वृथा गेलीं गडबडला असुर जाहला गुप्त,
कपिहि तसा गुप्तपणें सैन्यक्षय करुनि होय संतृप्त. ५१
प्रकटपणें स्वीकारी सुदृढ ब्रह्मास्त्रपाश असुराचे,
जय दुंदुभि वाजवुनी बांधिति करपद तया कपिवराचे. ५२
आबालवृद्ध टोंचिति बोंचिति उपटून केश जांपविती
कितियेक पुच्छ ओढिति मोजुनि किति वदति पाहु लांब विती. ५३

वंदुनि इंद्रजित वदे ताता! केलें कपीस बद्ध रणीं,
हनुमंत बुभुःकारें हालवि सचराचरा सकल धरणी. ५४
सामान्य नव्हे कपि हा मीहि रणीं थकुनि जाहलों हतसा,
शस्त्र न घे शर न रुते देह बनविला सुतीक्ष्ण लोह तसा. ५५
अस्त्रें निष्फल होती रूपें धरि बहुत गुप्त संचारे,
कथिलें पदीं करावें मंत्रिमतें विहित तेंचि सुविचारें. ५६

अंजनगिरिसा बैसुनि उच्चासनिं हालवीत कर वीस,
कोपें दशमुख पाहे दानवकुलशततमांतकरवीस. ५७
भय दावुनि कपिस वदे वन कां विध्वंसिलेंस सांग खरें,
दैत्यक्षय कां केला न वदसि तरि वधिन शासनें प्रखरें. ५८

श्रीरामा स्मरुनि वदे मी रघुकुलटिळकदूत वैश्रवणा,
हितगुज तुज सांगाया आलों गा सावधान हो श्रवणा. ५९
वनविध्वंस न केला कपिभावें मारितां उड्या जाला,
येतां असुर वधाया झाला प्रारंभ सहज झुंजाला. ६०
निष्कारण मज कपिला जे आले राक्षसेश्वरा! खाया,
न्यायें तयांस वधिलें प्राणाधिक हा स्वदेह राखाया. ६१

मी बद्ध बांधिता तूं ऐसें मनिं मानितोस परि चुकशी,
जी सत्य ती न तुजला कळवुनियां गुह्य गोष्ट वंचुं कशी. ६२
मूर्खा! पाश तुझे मज बांधुं न शकती निशाचरा! कुटिला!
जेणें अक्षय नामा पुत्र तुझा लोहमुद्गरें कुटिला. ६३
पाश उडविले केलें पुच्छासन उंच रावणाहून,
बोले मतिमंतें त्वां तोषविला आदरें बरा हून. ६४
ब्राह्मणवंशोद्भव तूं दुष्कर्मे असुर निंद्य या जगतीं,
सुविवेकें सहज कळे त्रैलोक्याची सदा अनित्य गती. ६५
देहाहंकृतिनें कधिं इंद्रियविषयीं नये शिरुं नरांनीं,
सिंधुजलोद्भवमौक्तिक सुज्ञें शोधूं नये शिरुन रानीं. ६६
आत्मा अविक्रिय सदा गगन तसा सूक्ष्म सर्वगत नित्य,
कल्पांतींही न मरे मृत्युमुखग्रस्त देहचि अनित्य. ६७
मंडूक व्यालमुखीं मुख पसरुनि मक्षिका धरूं पाहे,
कालव्यालमुखगतें त्वां धरिली जानकी सुरूपा हे. ६८
जीवास दुःखदात्री कुमति मनाधीनता त्वरित टाक,
निगमागमवंद्यश्री हरिभक्तिच दाविते सुखतटाक. ६९
साधाया आत्यंतिक हित रघुपुंगवपदीं शरण जा त्या,
पावन करील तुज तो परम सुकोमल दयार्द्र मन जात्या. ७०
सादर पदीं समर्पी स्वीकार करा वदे जगज्जननी,
जीच्या लोभें सांप्रत पडला आहेस गा भवव्यसनीं. ७१
स्तविता असें तुला तो त्रिजगत्पावन करील पावन रे!
हरिभक्तिविण करावा मोक्षागारीं कसा रिघाव नरें. ७२
हें जरि न रुचेल तुला भरलें मनिं समज वर्षशत आजी,
परकामिनीहरा तो दाशरथीप्रभु तुला वधिल आजीं. ७३
स्मरण करीं वालीचें कक्षिपुटीं दाबिलें तुला जेणें,

अंगदनखव्रणांकित लपवुं नको वदनदशक लाजेनें. ७४
त्या वालीसहि रामें वधिलें एकाच सायकें, याचा—
करुनि विचार धरावा स्वहितास्तव पंथ शरण जायाचा. ७५
भक्तिविणें मुक्ति नसे राज्यांतीं पतन रौरवीं नर्की,
श्रीरामीं भवदमनी शक्ति जशी तमविनाशिनी अर्कीं. ७६
श्वाना मिष्टान्न तसें न रुचेल तुला मदीय वच साच,
लागावा ज्वरिताशीं अमृताचा रस न काय कटु साच? ७७
कृतदुष्कर्माचें फल चुकवे ना अचुक भोगणें घडतें,
द्याया अपयश लोकीं अमरांसहि तेंच सर्वथा नडतें. ७८

झाला हृत्सद्मींचा कोपाग्नि ज्वलित बोधपवनानें,
ज्वाला नयनगवाक्षीं दिसती वदतां द्विपंच वदनानें. ७९
निर्भयपणें कसा रे! अधमा! मज दुष्ट भाषणें करिसी,
महिष मदोन्मत्तपणें कैसी पावेल साम्यता करिशीं. ८०

कपिवर बोले भ्याडा! दाहक परि वान्हि भीतचि जळास,
रामासन्मुख तैसा सीताहरणीं न तूंचि धजलास. ८१

असुर वदे माझी तव अनुचित कर्मेंचि होतसे लाही,
सुग्रीवलक्ष्मणान्वित रामास रणीं वधीन तुजलाही. ८२

प्रलयाग्निसा खवळला पर्वतसा वाढला पवनतनय,
गर्जुनि वदला नीचा! असुरा! तुजला शिवेच ना विनय. ८३
कोट्यावधि तुजऐसे रावण मारीन दुर्मदा साचें,
दावीन या क्षणींही अद्भुत बलवीर्य रामदासाचें. ८४

आज्ञापितां दशास्यें कपिचे तुकडे करावया, दनुज–
सरसावले, तयांना वारी बोलून धाकुटा अनुज. ८५

दूत कदा न वधावा नच बांधावा जिवंत सोडावा,
बोधावा सुज्ञपणें नृपनीतीचा न नियम मोडावा. ८६
अन्यायें स्त्री हरुनी दूताचीं नायके वचें हितशीं,
प्रबलपणें अभिमानें अविचारें वरिसि निंद्यताहि तशी. ८७
वधितां दूत रिपूचा वार्ता रामास कोण कळवील,
पाठिव सचिन्ह यातें तेणें युद्धार्थ चित्त वळवील. ८८

रावण वदे कपीचें भूषण हें दीर्घ पुच्छ जाळावें,
न मरो मरोहि अथवा वध न करुनि नीतिशास्त्र टाळावें. ८९

मेळविती बहु वस्त्रें पुच्छीं गुंडाळिती दनुज सारे,
हालवि बांधुं न दे कपि अन्योन्यां वदति धरुनि बैसा रे! ९०
लांगूल वृद्धि पावे वसनें सरतां अधीक आणविती,
उदिमी हांसुनि वदती रामास्तव काय होय खाण विती. ९१
नगरीं वसन न उरलें एकांबर सकल नागरिक झाले,
वसनें शोधायाला नगरीं कित्येक राक्षस निघाले. ९२
राजस्त्रियाहि देती ठेउनि एकेक वस्त्र मोलाचें,
दनुजेश्वरेंहि दिधलीं त्रिभुवनिं ज्यां वसन नाहिं तोलाचें. ९३
ह्मणतां बिभीषणें निज वस्त्रें अद्यापि नाहिं पाठविलीं,
कपिरायें पुच्छाची पूर्णत्वें त्वरित वाढ थांबविली. ९४
तैलहि घरोघरींचें आणविलें पुच्छ भिजविलें सकल,
पेटावितां अग्नि न घे फुंकोनी दैत्य जाहले विकल. ९५

स्वमुखें दशमुख फुंकी श्मश्रुसहित पेटली सकल दाढी,
विझवुनि घेइल वदती तरु जैसा, घेत तोडितां वाढी. ९६
पेटुं दिलें हालवुनी पुनरपि विझवून ताडिले बहुत,
बहु थकले घाबरले किति वदती पुच्छ हें न होय हुत. ९७

शपथ तुला रामाची वदतां संपूर्ण पेटलें त्वरित,
ज्वाळा निघति भयानक पेटविते जाहले भयज्वरित ९८

राजा वदे कपीची बांधुनि नगरांत धिंड काढावी,
जातां निजयूथीं हा व्यंगत्वें हीनताच वाढावी. ९९

करितां तसें पहाया जमले नरनारिंचे अनेक थवे,
हांसुनि करिति टवाळी स्मरुनि कृतविटंबना न जे कथवे. १००
पश्चिमसिंहद्वारावरि रक्षकगण विनाशुनी चढला,
प्रज्वालित निजपुच्छें कपि लंकानगरदाहनीं गढला. १०१
विझवावयास धांवति करिती आक्रोश चेतला अग्नी,
मार्ग न सुचे पळाया ज्वाळांचे लोट चालले गगनीं. १०२
फुटती स्तंभ कडाडां कोसळती धडधडा ज्वलित सदनें,
मयजामातसदनही जाळुनि विलयास तो दुरासद नें. १०३
वगळुनि बिभीषणाचें रम्य सदन सकळ जाळिली लंका,
रावणमनिंची फिटली रामचरणदासशक्तिची शंका. १०४
आबाल वृद्ध उभयस्त्रीनर बहु अग्निच्या मुखीं पडले,
सकल दिशा अग्निमया दावानळिं जंतुसे असुर अडले. १०५

सीतास्तवनें तोषुनि पवनसखा तत्सुता गमे जलसा.

सागरतीरीं गेला कपिवर नगरीस घालुनी वळसा. १०६
अग्निविसर्जन केलें निटिलस्थितघर्मबिंदुजल पुशिलें,
सजल परत निघाया वंदुनि वैदेहिला कुशल पुशिलें. १०७
विदित तुला स्थिति माझी वृत्त तुला अधिक काय सांगावें,
अघटित लीला पाहुनि वाटे संतत तुझ्या यशा गावें. १०८

हो पंथ तुझा शुभ हो वत्सा ! पवनात्मजा ! चिरंजीव,
सद्भक्ति पूर्ण निजमन रघुपतिपदसेवनेंचि रंजीव. १०९

लंकादहनचरित हें गानशतें निज यशोधनमुखानें,
वक्ता होउनि वर्णी ऐकुनि विरमो रघूत्तम सुखानें. ११०

शतक षष्ट समाप्त.

यशोधन.

---

## वर्षर्तुवर्णन.

( मागील अंकावरून पुढें चालूं. )

श्लोक.

अतितर सलिलाचा भार जे वाहताती,
रव करिति बलाका मालिकांना धरीती;
घनमहदगशीर्षीं स्वल्प विश्रांति घेती,
पुनरपि पुढती ते वारि वर्षीत जाती. २६

साकी.

चोहिकडे हें कोमल हिरवें गवत उगवल दाट,
शुकाभपातळ नेसुनि केला भूमिवधूनें थाट. २७

तृणावलींच्या मध्यें मध्यें इंद्रगोप जे दिसती,
त्याच्यावरि जणुं जतुरसबिंदू शिंपडलेले असती. २८

श्लोक.

निद्रा हळू वृष्टिपतीस येई ॥ नदी त्वरेनें उदधीस जाई,
भेटे बलाका मुदिता घनाला ॥ रामा सकामा अपुल्या प्रियाला. २९

हर्षें उत्तम नृत्य हे करिति या बर्ही वनीं विभ्रमें,
आली सुंदरही कदंब तरुच्या शाखा शिखांना सुमें;
गाईंना वृषभासमान अगदीं आला असे माजही,
नाना शस्यलता तृणाकुलवनीं भारी विराजे मही. ३०

वहाति सरिता जवें सलिल वर्षती वारिद,
प्रमत्त करि यूथ हे करित नाद भीतिप्रद;
वनांत किति शोभती मदभरें शिखी नाचती,
वियोगि जन आपुल्या करिति रे! प्रियांची स्मृती. ३१

क्रीडार्थी मदमत्त वारणकुलें आलीं वनीं निर्झरीं,
हुंगोनी नवकेतकीपरिमला संहृष्ट जी जाहली;
ऐकोनी प्रपतत् झरध्वनिस ती संभ्रांतशी होउनी,
संन्नादा करिताति बर्हिणगणासंगें पहा! काननीं. ३२

भृंगानीं मद उत्सवें मिळविला वाढिन्नला जो अती,
स्वादें पुष्परसाचिया हलु हळू ते तो अतां टाकिती;
धारापात विशेष जर्जरतनू होऊनि नीपांचिया,
शाखामाजि विलंबमान दिसती देखे वनान्ता तया. ३३

साकी.

अंगाराच्या चूर्णचयासम काळी मधुर रसाळ,
जम्बूशाखा नाहीं आली फळें नितान्त विशाळ. ३४

नव्हति जांभळें हीं; ह्या भासति सुंदर मधुकरपंक्ती,
जणुं कीं जम्बू शाखांना त्या प्राशुनि टाकीताती. ३५

श्लोक.

सौदामिनीध्वजविभूषित मेघराजी,
गंभीर दीर्घ रव जे करण्यास राजी;
गाजी अशा करिवरासम घोर आजी,
शोभायमान दिसती मजलागिं आजी. ३६

जाण्यास जो शैलवनीं निघाला । ऐकोनि हत्ती घनगर्जिताला,
शंकोनि अन्य द्विपबृंहितातें । मागें कराया फिरला रणातें. ३७

साकी.

नव्हेत मंजुल मधुप झंकृतें वनान्त गीतें गाती,
मयूरनृत्यें नव्हत भासतें वनान्त नर्तन करिती. ३८
मदांध करिवर संचारें जणुं झाले मत्त वनान्त,
अनेक भावाश्रयास करुनी दिसाति श्रील नितान्त. ३९
कोठें गायक कोठें नर्तक मत्त कुठें दिसतात,
अलिकुल चंद्र किं करिकुलसंगें विलसति बहुत वनान्त. ४०

श्लोक.

कदम्बांचीं पुष्पें धवल तरुचीं चारु असती,
स्थलांभोजें माध्वीसदृश जल जी मार्जि करिती;
रुतें नृत्यें केकी मजसि गमतें यावरुनिही,
सुरापानस्थानप्रतिम दिसतें काननमही. ४१

मुक्तासम स्वच्छ असें पडें जें,
पाणी महापत्रपुटांत ताजें;

तृष्णार्त ते जें खग तुष्ट पीती,
यत्पक्ष आसारविवर्ण होती. ४२

वीणा षट्पदराजि मंजुल गमे संगीत तद्गुंजित,
अंभोदालि नव्हे मृदंगचि असे गंभीर नादान्वित;
भेकांचे अवघेचि निस्वन तसे ते कंठतालध्वनी,
वाटे उत्तम गायनास अजि या आरंभ झाला वनीं. ४३

कोठें नाचति नीलकंठ करिती कित्येक केकारवां,
बैसोनी अवलोकिती तरुशिरीं संगीतनृत्योत्सवा;
बर्हालंकरणें विचित्र रुचिरें स्वांगावरी लेउनी,
मोरानीं बघ! नृत्य गायन कसें आरंभिलें या वनीं. ४४

साकी.

निद्रा घेउनि फार वेळ हे शुष्क मृत्तिकेमाजी,
परिसुनि मेघध्वनीस जागृत झाले दर्दुर आजी. ४५

अनेकरूपाकृति असती जे नानावर्ण निनाद,
धारापातें जर्जर होउनि करिती प्लवंग शब्द. ४६

श्लोक.

दूरी पाठवुनी जशा गुरुजना कामातुरा कामिनी,
पुष्पादी उपहार घेउनि सवें संपूर्ण भोगार्थिनी;
येती स्वीकृत भर्तृसन्निध तशा उत्तुंगचक्रस्तनी,
अब्धीला मिळती विशीर्ण करुनी कूलें दूरी या धुनी. ४७

नीलांबुदीं नील नवांबु पूर्ण,
अंभोद हे शोभति सक्त जाण;
दवाग्नि दग्धांत दवाग्नि दग्ध,
शैलांत शैलासम मूलबद्ध. ४८

ज्यामध्यें मत्त बर्ही करिति मदभरें नृत्य केकारवांनां,
तैसे हे इंद्रगोप प्रचुर निपजुनी व्यापिती शाद्वलानां;
झाली नीपार्जुनांचीं विकसित कुसुमें सूटलासे सुगंध,
रम्यारण्यांतरीं या चरति करिकुलें होउनीया मदांध. ४९

आसाराहत–केसरा निरखुनी संफुल्ल पद्मावली,
आलिंगूनि तियेस केवल निघोनी तेथुनी हे अली;
ताजी केसरयुक्त नीपकुसुमें हर्षोद्रेकें चाखिती,
देती दुःख वधूवियुक्त मनुजां सौम्या निजा झंकृती. ५०

हत्ती फारचि माजले, वृषभ हे अत्यंत आनंदले;
झाले सिंह पराक्रमी विपिनिं या ताजे तवाने भले,
आलीसे रमणीयता नृपतिंनां उद्योगही सांडिले—
त्यानीं; खेळ घनासवें सुरवरें नानापरी मांडिले. ५१

अपूर्ण.

धूर्जटी.

---

## प्रणयपत्रिका.

ही कविता आमच्या एका मित्रास मिळालेल्या पत्रावरून तयार केली आहे. पत्र फार गोड असल्यानें तें पुढें देतों. या पत्रांतील विचार साधे पण प्रेमानें व निराशेनें ओथंबलेले आहेत.

" विनंती विशेष. पत्र लिहिण्यास कारण (कीं) माझ्या कालच्या पत्राचें उत्तर न आल्याकारणानें मला अतिशय दुःख होत आहे. कारण अशा स्थितींत आपण मला दुःखांतून मुक्त करावी तें तर दूरच राहिलें परंतु मी होऊन लिहिलेल्या पत्राचें उत्तर देखील आपण पाठवूं नये काय? मला वाटतें त्यांत आपलें कांहीं तरी कपट असावें. असो. आजपर्यंत मी आपलें पुष्कळ प्रकारें आर्जव केले, व वारंवार आपणांस

पत्रें ही पाठवीत होतें, परंतु आतां मला वेळोवेळीं पत्रें लिहिण्याचें मुळींच त्राण राहिलें नाहीं हेंच पत्र लिहित आहें पण माझ्या कृपाळास एकसारखी कळ लागली आहे. फक्त हा माझा जड देह आपल्या सहवासानें सुखावह होईल ह्मणून मी आपणांस हें पत्र लिहीत आहे. दुसरें कारण कीं माझी आई कदाचित् मला सुखांत पाहून तरी आपलें दुःख कमी करील अशी मला आशा आहे. कारण ती नेहमी मला ह्मणते तूं तरी सुख भोगून मी पहावें अशी माझी फार इच्छा आहे. माझ्यानें आतां जास्त लिहिवत नाहीं. आपणास जर मला ह्या दुःखांतून काढणेंच नसेल तर मला त्याप्रमाणें लिहून कळवावें. ह्मणजे पडलेल्या संकटांत सुखाची आशा करण्याचें कारण नाहीं. कारण आपली इच्छाच जर अशा प्रकारची असेल, तर माझी करुणा आपणास येणें अशक्य गोष्ट आहे. असो. हा जन्मच दुःखी ह्मणून आयुष्यांतील दिवस काढणें भाग आहे. कळावें हे विज्ञापना."

श्लोक.

दिवस बहुत झाले सोडुनीया गृहाला,
प्रसित नयन होती पाहण्याला प्रियाला;
ज्वलत विरहवन्ही निर्बला ही न साहे,
कारें जणुं धरुनीया ठेविला जीव आहे. १

किति तरि चरणीं मी धाडिल्या पत्रिका त्या,
क्षण न मिळत कां हो आपणा वाचना त्या;
खचितचि अबलांतें अल्पही ज्ञान नाहीं,
जगतिं तरि तयांची काळजी कोण वाही. २

खचित विरहबाधा होत नाहीं नरांला,
जगीं सकल विकारें दुःख होई स्त्रियांला;

विधिनियमित गोष्टीला नको तें प्रमाण
कधिं न घडतसे ती भाग्यवंतांस वाण ३
सुख सकल नरांच्या पूर्ण सेवेंत राहे
हरहर ! अबला मी वंचिता दुःख वाहें
कथुनि निजविपत्ती व्यर्थ कां कष्टवावें
बघुनि मनुजलीला दुःख तें आंवरावें ४
बघुनि मजसि माता गाढ दुःखार्णवांत
सतत तळमळे ती आपल्या मानसांत
वदत मज कितीदां " देखुनीया सुखांत
तुजसि विसर पावो दुःख जें मी पहात " ५
किति तरि अपणां मी आळवूनी लिहावें
कपट मजसवें तें काय ऐसें करावें
किमपि मम शरीरीं राहिलें त्राण नाहीं
जगतिं न जड देहा सौख्य होई कधींही ? ६
विनति करि सख्या ! ही संकटांतूनि काढा
त्यजुनि निज विरक्ती प्रेमळा ! पत्र धाडा
प्रभव सुकुनि गेला हाय कैसा सुखाचा
लवकरि करुणेशा ! अंत हो या तनूचा ७
नयन न मिटती ते जातसे रात्र सारी
तिळतिळ तुटतो हा वाटतो जीव भारी
हृदयकमल नाथा जातसे कीं सुकूनी
प्रणयजलभरें त्या तुष्ट द्यावें करूनी ८
गेलां तूह्मी अवचित कसे सोडुनीया गृहाला
होतें निद्रावश चुकवुनी दूर देशास गेलां

जागीं होतां मजासि शयनीं रम्य मूर्ती दिसेना
एकाएकीं मजवरि असा रोष कां हें कळेना ९
प्रेमाचा तो कधिं नच कुणा वीट येई जगांत
नाथा! वृत्ती अपलि बघुनी खिन्नता ये मनांत
झाला कांहीं चुकुनि जरि या दासिहस्तें प्रमाद
शांती चित्तीं धरुनि वदतें सोडुनी द्या विषाद १०
भीतेला द्या अभय वितरा सौख्य या दुःखितेला
दीनेला या पदरिं अपल्या घ्या प्रिया किंकरीला
प्राणाला या जगिं नच तुझा वांचुनीया विसांवा
आहे तूझाप्रतिच अपला देह मी अर्पिलेला ११
नक्षत्रांचा प्रियकर यदा जाय अस्ताचलाला
रम्यत्वातें त्यजुनि रजनी पावते शून्यतेला
मच्चिताचें झडकरि तसें शांतिचें स्थान गेलें
दावूं कोणा मन तळमळे भाग्य माझें निमालें १२
तारा, नाथा अगतिक वसे गाढदुःखार्णवांत
इंदू कैसा कमलिनि तुझा अंत पाहीं प्रशांत
भाग्यीं देवा! किमपि लिहिलें सौख्य नाहीं कसें रे!
तल्पीं राहें तळमळत मी विभ्रमे चित्त सारें १३
वज्राहूनी प्रियकर करी चित्त कैसें कठोर
देवा! ज्याची निशिदिनिं वसे मूर्ति माझ्या समोर
कर्माची ही खडतर कथा सांगुं आतां कुणाला
रक्षी देवा! तुजविण अतां कोण या निर्बलेला १४
नाथा! ल्याहा निज कुशल तें सर्व सोडून काम
चित्ताला या क्षणभर मिळो अल्पसा कीं विराम

पाण्यावीणें झष तळमळे तेविं ही दीन दासी
दुःखार्ता ही विनति करिते लीन हो! या पदांसी १५

क्वचित अधिक गेला शद्ब माझा चुकूनी
पदर पसरतें मी दासि हस्तद्वयांनीं
समजुनि अवमानी माननीयांस कोण
जगतिं खचित देती सर्व त्यांलागिं मान १६

किमपि मज सुचेना आपल्या मूकभावें
अरति कथनलेखें व्यर्थ कां शीणवावें
अशनिं शयनिं पानीं आपलें घेत नाम
चरणिं विरहिणीचा नर्मदेचा प्रणाम १७

---

कृष्णतनय.

## नाम--कथन!

आपल्या प्राणप्रिय अर्भकाच्या संरक्षणाची जबाबदारी कवीवर टाकून सद्गुणी कविकन्येनें अकालींच दिव्यलोकीं प्रयाण केलें! मातृविरहानें अनाथ झालेलें तें दुर्दैवी कोमलार्भक कृत्रिमोपचारबलानें गहन जगदरण्यामध्यें शनैः शनैः संचार करीत आहे! या मुलीच्या जनकानें– कवीच्या जामातानें एकदां मुलीचें नांव काय ठेविलें आहे? असें पत्रांतून कवीस विचारिलें, त्यास कवीनें पुढील उत्तर दिलें!

### श्लोक.

कन्येला सुतरत्न सुंदर असें होईल ही कामना!
होती फार मनीं परंतु नच हें ये ईश्वराच्या मना!
वाणी खेद–समन्विता परिसिली ही जैं स्वभार्यामुखें
"झाली गोष्ट बरी." हंसून वदलों कांतेस मी कौतुकें! १

सर्वांनाहि जगांत पुत्रच हवा ! ऐसेंच झालें जर !
भार्यालाभ जगांत कोठुन नरा होईल सांगे तर ?
हा संसार असार होइल सखे ! कांतेविना निश्चित
मद्वाणीश्रवणें दिसें चमकलें भार्याननीं तों स्मित ! २

बालेनें जननीसुखा दिन दहाही सेविले जों नसें
तों दुर्दैव महा भयंकर असें चालून आलें कसें ?
हा ! हा ! होरपळे सुतातनुलता दुर्व्याधिदावानलें
झाले सर्व उपाय निष्फळ. कळे हें चिन्ह नोहे भलें ! ३

झाला रोग–विकोप; निश्चल पडे कन्यातनू गोजिरी
आला मृत्युसमीप खास कळलें कन्येसही अंतरीं !
सर्वांनाहि समीप बैसवुनियां जेव्हां तिनें घेतलें
वाणी न स्फुट होय; नेत्र भरले तैं अश्रुधाराजलें ४

मत्कांतेस न लेश धीर धरवे; ती सारखी ओरडे
हा ! हा ! तो कठिण प्रसंग बघुनी येई न कोणा रडे ?
कन्येनेंच परंतु धैर्य धरिलें ! दुःखास ती आवरी
बोले स्पष्ट हळूं हळूं सहृदया सर्वांस तैं यापरीः– ५

"आतां दुःख करूं नकाच ! तुमच्या ऐकून आक्रंदना
माझ्या क्षीण मना खरोखर पहा होती महा यातना !
आतां या जगिं अल्पकाल उरलें माझें असे राहणें !
तेव्हां बोल अखेरचे स्थिरमनें माझे तुह्मी ऐकणें ! ६

केली ही क्षणभंगुरा नरतनू विश्वाचिया नायकें
मृत्यूतें चुकवावयास जगिं या प्राणी न कोणी शके !
जाणें भाग कधीं तरी जर असे जीवास कालोदरीं
तेव्हां दुःख अशाश्वतार्थ करणें हें योग्य कां यापरी ? ७

मी तों अल्पवयी अजून पुरता संसार झाला नसे
आशेचे रचिले मनांत मजले गेले पडोनी कसे !
जाणें भाग पडे त्यजून सकला नाहीं पुनर्दर्शन !
पंचप्राण सुता सुकोमल; कसें होईल तद्रक्षण ? ८

ऐसी दुःखपरंपरा मजपुढें राहे उभी ही जरी
मृत्यूची रतिमात्र भीति न शिवे माझ्या मनाला तरी !
ये सौभाग्यपणें मला मरण हें पाहून माझ्या मना
होतें जें सुख दिव्य आज करवे कोणा न तत्कल्पना ! ९

वाटे दुःख मनास एक पण या मी आजपर्यंत, न
कांहीं सौख्य असें दिलें; निशिदिनीं माझें तुह्मां चिंतन
बालारक्षणदुःख ठेवुनि तुह्मां आतांहि मी चालिलें !
माझ्या निर्दयते तुला न ! हृदयीं हें शल्य भारी सले ! १०

आतां यास उपाय काय उरला ? होणार तें होतसे !
द्यावें सोडुनि हे विचार अवघे हें योग्य आतां दिसे !
ताता ! ही दुहिता ह्मणून पदरीं मी आपल्या घालितें
सांभाळा करुनी कृपा मजवरी हें मागणें मागतें ११

प्राणाहून गणाल ही प्रिय तुह्मी बाला मनोज्ञा मनीं
सर्वांचेंहि जडेल चित्त–लवही शंका न–तत्पालनीं
ही झाल्यास पुढें जगत्पतिकृपें रूपागुणांनीं बरी
गोपालास न पाहणें विनति ही ताता ! दुजी नोवरी ! १२

विद्या–भूषणभूषिता गुणवती ही हो स्नुषा आपली
जाणोनी अमितोपकार; तुमची सेवा करी चांगली
पूज्याऽशीर्वच–लाभकाम, हृदयीं ठेवोनि ही शर्मदा
होओ धन्य जगीं असें विनवितें मी ईश्वराच्या पदा ! १३

केली तार, अजून कां तिकडचें येणें नसे जाहलें ?
आतां लाज हवी कशास ? मन हें तद्दर्शनीं वेधलें !
योगायोग नसे ! मदीय कळवा विज्ञप्ति आल्यावर
"झाले जे अपराध आजवर हो त्यांची क्षमा सादर !" १४

आतां फार न बोलवे; बिघडली सारी मदंत:स्थिति
द्या प्रेमें मजला निरोप सकलीं ठेवा मनीं मत्स्मृति !
आली गाढ सुरेख झोंप; निजतें सानंद मी शाश्वत !
कोणीं यत्न करूं नका मज तुह्मी आतां करूं जागृत ! १५

"देवा ! श्रीकमलापते ! गणपते ! विष्णो ! घनश्यामला !
कृष्णा ! दत्तगुरो ! पदीं चिर असा द्या आसरा या मला ! !"
उच्चारी मग शांतिधाम बरवा जों 'राम राम' ध्वनि
प्राणज्योति अहा ! खळें विझविली कालानिळें तत्क्षणीं ! ! १६

नाना सद्गुणमंडिता निज सुता स्वर्गास गेली कळे
हा ! हा ! हा ! उसळे भयंकर महा शोकाब्धि तेंव्हां बळें !
सारें धैर्य गळे ! विवेकहि पळे ! ; चालें महाक्रंदन !
झाला घोर अनर्थ ! कोण शकतो त्याचें करूं वर्णन ? १७

बाळा पूर्ण अभागिनी जर अशी ही मातृ–सौख्या मुके !
ठेवावें मग नांव हौस धरुनी कोणीं इचें कौतुकें ?
नाहीं ठाम अजून नाम दिधलें बालेस आह्मी जरी
नाना--नामवती तरी निजगुणीं झाली असे ही खरी ! ! १८

सौख्याचा टपुनी जिच्या खळ यमें धागाच गुंडाळिला !
यासाठीं ह्मणती मुलें मज गमे 'गुंडी' ह्मणोनी तिला !
हें तों नाम न रम्य सार्थ न तरी वाटे तिला आवडे !
गुंडी हा ध्वनि ऐकतां बघतसे सानंद चोहोंकडे ! १९

पाजायास्तव ठेविली स्वसदनीं आणून दाई जरी
सत्तेची न परंतु ती, समजलें बालेस कीं अंतरीं ?
यासाठींच तिनें नितांत धरिली ही काय शांतस्थिति !
सारें मत्सख सार्थ नाम इजला शांता असें ठेविती ! २०

कन्येच्या निधनामुळें झुरतसे जी हाय ! रात्रंदिनीं
झालों निष्फलयत्न सत्य कथितों मी यन्मनःसांत्वनीं !
प्रारंभीं भय हेंच थोर पडलें होतें खरें मन्मना
'ही जाणार निघोनि शीघ्र दयिता स्वर्गीं सुता–दर्शना !' २१

त्या माझ्या गृहदेवतेस ललिता यद्बाललीलावली
कीं साक्षान्नवजीवनप्रद अशी संजीवनी जाहली !
भार्यात्रस्त मनास ही रमविते नानापरी संप्रति
ठेवा नाम 'मनोरमाच' इजला कोणीं असें सांगती ! २२

मद्भार्या निजमातृ–नाम 'तुलसी' केव्हां इला देतसे
केव्हां बोलतसे खरी "गुणवती" 'लीलावती' ही असे !
आहे सान जरी तरी प्रकटवी ही आपुले सद्गुण
कोणां हर्ष न होय रम्य बघतां या बाललीला क्षण ! २३

प्रेमें गाउनि मी जईं करितसें श्रीकाव्यदेव्यर्चन !
तेव्हां बैसुनि माझिया जवळ ही लागे करूं गायन !
निद्रा भूक तहान भान विसरे पाहे न कोणाकडे
डोले प्रेमभरें ! अशी रसिकता कोठून ईतें जडे ! २४

जातां लक्ष्य मधून अन्यविषयीं निस्तब्ध मी होतसे
गाया शीघ्र फिरून तैं सुचविते गाऊन आऽऽआ असें !
मद्भाग्येंच असा अलभ्य रसिक श्रोता मिळाला असे
यासाठीं प्रिय बालिकेस 'रसिका' हें नांव मी देतसे ! २५

बाला--नाम विचारिलें ह्मणुनिया सांगीतली ही कथा !
या बालेवर आपली पण असे सत्ता खरी सर्वथा !
तेव्हां यांतिल नांव गोड गमतें जें कोणतें तें खरें--
ठेवावें दुसरेंच कीं कळविणें हें स्पष्ट आह्मां त्वरें ! २६

——— विष्णु बाबाजी कुळकर्णी.

## एका पर्वतास.

श्लोक.

वज्राघात न साहवे ह्मणुनिया झालास कां मूर्छित ?
झाला काळ किती तरी न वदती कोणीहि 'कीं बा उठ'
"थोरांचें सगळेंच थोर" दिसते मूर्छा तशी थोरली
ही कल्पांतवरीहि काय ? अरिची शक्ती बरी भोंवली १
किंवा "पक्षविहीन" लोक ह्मणती वाटे तुला खंतही
यासाठीं वदनास तूं लपविशी नुच्चारिशी शद्बही
गेला मान खरा ! "नभश्चरखगश्रेष्ठांत सम्राट" हा
जातां लौकिक दुःखितांतर न कां होईल मानी महा २
आज्ञाधारक शिष्य तूंच तुजशीं नाहीं तुळाया दुजा
तैसा तूं दृढनिश्चयीहि दिसती भारीच मह्यात्मजा !
कोणी निश्चल शांतता तुजपरी नाहीं जगीं दाविली
कीर्ति श्रेष्ठ 'असह्य साहक' अशी संतीं स्वयें गाइली ३
योगी मुग्ध ह्मणूं तुला वद ? तपोनिष्ठा ! गभीरांतरा !
नाना थोर वनस्पती ह्मणुनिया धन्वंतरी कीं पुरा !
वाखाणूं तुजला धनाढ्य ह्मणुनी वा दानशूरोत्तम !
विश्रांतिस्थल तारकादिक नभस्थांचें ह्मणूं उत्तम ? ४

——— महादेव भिमाजी कुळकर्णी.

# काव्यरत्नावली.



## अंक ६ वा.

## स्नेहलता

हुंड्याच्या अनिष्ट चालीमुळें आमच्या समाजाची भयंकर हानी झाली आहे. तिचें निर्मूलन करण्यास यापुढें आमच्या समाजांत जर कांहीं प्रतिबंध होणार नाहीं, तर त्या चालीचे दुष्ट परिणाम आह्मास खास भोगावे लागतील. ह्या दुष्ट चालीनें आमच्या समाजासच कीड लागली आहे असें नाहीं, तर हिंदुस्थानांत सर्वत्र ह्या चालीचा घोर परिणाम पसरला आहे. थोड्या महिन्यांपूर्वी बंगाल्यांत ह्या चालीमुळें किती अनर्थ ओढवले गेले हे चाणाक्ष वाचकांस विदितच आहेत. त्या अनर्थांपैकीं कलकत्ता येथील स्नेहलता ह्या नांवाच्या वंगकुमारीनें केलेला आत्मयज्ञ हा एक होय. ह्या आत्मयज्ञाची कथा पुढील काव्यांत कवीनें गोविली आहे.

चाल:—("चंद्रकांत राजाची कन्या" या चालीवर.)

कळी उमलली जों न पावली पूर्ण विकासाला,
अदय कराचा तोंच तिजवरी पडला कीं घाला.

विनायक.

कोमल लतिका आलिंगाया पाहे वृक्षाला,
समूळ खुडिली झंझावातें यावी भूमीला. १
सुधाचषक जों मोदें न्यावा निजाननाजवळ,
गरलबिंदु तों सहसा पडला त्यांतच तत्काळ. २
हरेंद्रचंद्रा वंगजविप्रा स्नेहलता बाळा,
प्रियकर असुनी प्रिय झाली ती सत्वर काळाला. ३
शास्त्राद्रूढिर्बलीयसी हें विद्वज्जन वदती,
नमोऽस्तुते गे! रूढे! तुझिया पायीं जन बुडती ४

शुल्क घेउनी कन्यार्पण जो करी अदय बाप,
मागे हुंडा पुत्रविवाहीं जोडे त्यां पाप. ५
श्रुतिशास्त्रानें निषेधिलें हें सत्य जरी असलें,
आधिपत्य तूं शास्त्रावरती रूढे! गाजविलें. ६
उपवरकन्या विवाहयोग्या परी दुष्ट चाली,
हुंड्याकरितां स्नेहलता ही अग्निमुखीं पडली. ७

उपवर झाली ती सुकुमारी सुगुणी स्नेहलता,
तल्लग्नाची तिच्या पित्याला रात्रंदिन चिंता. ८
सुस्थळ लाभो मत्कन्येला कोण न हें इच्छी,
कन्याप्रिय तो कन्येसाठीं भटके वर वांछी. ९
सुतायोग्यवरशोधन करुनी श्रमला मग लाभे,
चतुर सद्‌गुणी सुंदरसा जो कन्येला शोभे. १०
प्रयत्न पडले यथायोग्य परि लाधे जामात,
हरेंद्रचंद्रानंद न तेव्हां मावे गगनांत. ११
आनंदोर्मी सत्वर गेली समूळ विलयाला,
द्याल जरी मज मोठा हुंडा, वरितों बालेला. १२

विपुलैश्वर्यीं भोग भोगितो जो नर धनवान,
दहा बायका असूनि, त्यातें न एक संतान. १३
जेथें संतति नसे संपदा तेथें जन ऐसे
दुर्दैवी किति भूवर असती गणना त्यांस नसे १४
मरण बरें पण दरिद्रता ती जाचे मनुजाला
सत्य सत्य तें भर्तृहरी जें वदला सकलांला १५

लग्नाचाही उचितव्यय ज्या अतोनात वाटे,
हुंड्यासह तो पाहुन त्याचें हृदय कां न फाटे. १६
लग्नवयोमर्यादोल्लंघन झालें बालेचें,
लग्नावांचुन तीस ठेवणें योग्य न हें साचें. १७
दहा बरे सुत परंतु बरवी न गमे एक सुता,
पुत्र मिळविता होई तोंवर नसे लग्नचिंता. १८
अकिंचनत्वें सुतावयें तन्मन द्विधा झालें,
मनीं योजिलें कीं ठेवावें गहाण घर अपुलें. १९

कार्य सारुनी म्लान मुखानें गृहीं परत आला,
'फसलों' ह्मणुनी वृत्त सकल तें सांगे भार्येला. २०
होती बसली मातेजवळी वंगद्विजबाळी,
तातवचन तें ऐकुन दुःखें पडली ती काळी. २१
विषण्णचित्तें एकांतीं ती करी विचाराला,
काय करूं गे! संकटिं ऐशा पडलें मी अबला. २२
काय? जयानें जन्म दिला तो पिता स्वतांसाठीं,
पडे संकटीं गृहही देई द्रव्य नसे गांठीं. २३
पूर्वज आह्मी वसलों प्रेमें त्याच गृहीं आतां,
परके येउन राहतील हें साहवें न चित्ता. २४
मला पित्यानें जन्म दिला ही केली कां चूक,
ह्मणून चिंता लागूं नच दे त्या तृष्णा भूक. २५
ज्या मातेनें माझें ओझें उदरीं बाळगिलें,
कष्ट करोनी ज्या बापानें मजला वाढविलें. २६
पतिसह नांदूं सुखांत, लोटुन दुःखीं त्यां हाय!
उपकारांची अपकारानें फेड करूं काय? २७

जन्मा आला प्राणी त्याला मृत्यु कधीं चुकला,
नायकिलें हें आजवरी मग चुकेल कां मजला. २८
अभागिनी मी कीं मजसाठीं अन्नजन्मदाते,
झुरती रात्रंदिस ते नाहीं सौख्य मुळीं त्यांतें. २९
माझ्याकरितां स्वकीय जन जरि पडती दुःखांत,
काय दोष तो घडेल केला मी जरि देहान्त. ३०
" जन्म जयांनीं दिला तेच या जीवाचे स्वामी,
" भाग्यवंत ती पडे संकटीं पितरांच्या कामीं. " ३१
मद्धास्तव देणें गृह हें योग्य नसे काम,
उरो आज या इहलोकीं मम स्नेहलता नाम. ३२
जेथें नांदे अखंड शांती सौख्य पूर्ण पाहीं,
स्वार्थपरायण मृत्युलोकजन जिथें मुळीं नाहीं. ३३
चिंता नाहीं आधि व्याधी जरा मृत्यु नाहीं,
श्रीजगदंबेच्या चरणीं मी आज उडी घेई ३४

मत्पितरांनो ! यच्चिंतेनें अहोरात्र झुरतां,
चिंताकारण लेशहि ठेवीं मी न मुळीं आतां. ३५
रात्रीं येउनि दुर्गा माता स्वप्नीं मज बोले,
दुःखें झुरशी स्नेहाळे ! कां ये इकडे बाळे ! ३६
निश्चय केला तुह्मांस कथितें विनयें विनवीतें,
तत्पदसन्निध अग्निप्रिय मी होउनियां जातें. ३७
प्रेमजलानें वाढविली ही तुह्मी लतादुहिता,
सार्थ नाम हें केलें माझें शोभे स्नेहलता. ३८
आज्ञोल्लंघन आजवरी तें मजला नच ठावें,
आज्ञेवांचुन जातें मी जरि हो ! न रुष्ट व्हावें. ३९

भावंडांनो ! तुह्मा सोडुनी जातें मी हाय !
भजसाठीं मी दुःखकर्दमीं तुह्मां त्यजूं काय ? ४०
'बाबा' आपण कार्य सारुनी गृहीं परत येतां,
धावुन घाली घट्ट मिठी ही कंठीं प्रियदुहिता. ४१
गेला मम तो सर्व शीण गे ! ह्मणुनी मोदभरें,
मुके घेतले तेव्हां माझ्या हृदयीं मोद भरे. ४२
माते ! मोठ्या लडिवाळपणें वागविलें मातें,
सोडुन तुजला जातें गे ! परि दुःख बहू होतें. ४३
नीररहित हे वारिधि होतिल, शिलातलहि मोठे--
वितळुन जातिल परि प्रेम तव कधिं न ठरे खोटें. ४४
जातिल सागर शोषुन सगळे परि त्वत्प्रेमाचा--
क्षय अल्पहि नच होइल माते ! सत्य सत्य वाचा. ४५
तुमच्या प्रेमें आजवरी जें गमलें सुख मजला,
नृपकन्येला दुर्मिळ तें, जरि लक्ष्मी हो विपुला. ४६
मद्गमनानें जीव आपला व्याकुळ होईल,
वाटे मजला हर्ष परी गृह तुह्मांस राहील. ४७
येतें बाबा ! येतें माते ! आत्माहुतिसमय--
आला, जातें दुर्गाचरणीं नका करूं हाय ! ४८

धैर्याची तूं केवळ मूर्ती भगिनी मज वाटे,
ऐकुन वार्ता दुःखद तव ही शोक मनीं दाटे. ४९
निर्घृण काळा सगळे भीती वदती जन नित्य,
गमलें नाहीं कैसें तुजला भीषण हें कृत्य. ५०
हुंड्याचें तें नामचि निघतां मूर्तिमंत मूर्ति,
ठाके पुढती तव, ही झाली सान काय कीर्ति. ५१

स्वकुलरक्षणास्तव कृष्णेनें मोदें विषपान,
केलें मागें ठेवुन कीर्ती परलोकीं गमन ५२
त्वदीय कृति ही झाली तत्सम विद्वज्जनमान्या,
जन्मा येउन जाहलीस तूं लोकीं या धन्या. ५३

कुसुमपेलवा गेली त्यजुनी स्नेहलता बाला,
तत्कीर्तीचा दुंदुभि गाजे चारी खंडांला. ५४
स्वसौख्यरतजन कधीं न गणिती इतरांची विपदा,
वाटे त्यांस न लक्ष्मी चंचल, राहिल काय सदा. ५५
सदयविबुध हो! परिसा विनती रीती हुंड्याची,
अनर्थकारी त्यजा सत्वरीं योग्य न ही साची ५६
स्नेहलता ही दिव्य विभूती गमली सकलांला,
तद्गुणगायन विषय ह्मणोनी केला रसनेला. ५७

लक्ष्मण.

## वर्षर्तुवर्णन.

[ मागील अंकावरून पुढें चालू. ]

### श्लोक.

तिरस्कृत महंबुधिध्वनि नभोंगणीं राहुनी,
नद्यांतुनि सरोवरांतुनि तडागवापींतुनी;
समग्र पृथिवींतुनी जलद वाहवीती जला;
महा प्रवहि आविला जलद लक्ष्मणा! आजला. ५२
सरीवर सरी किती विपुल येति हे वाहती,
प्रभंजन महारयें करुनि नष्ट कूलाप्रति;

भरूनि दुथड्या जळीं किति तुडुंब फोफावती;
नद्या सकल मार्गही निरखि लक्ष्मणा! रोधिती. ५३

साकी.

उदधीपासुनि देवेंद्रानें आणियली जी आणी,
समीरणानें सन्निध केली अभिनव निर्मळ पाणी. ५४
घनरूपी घट त्यांहीं भरुनी सुरेंद्र कारि अभिषेक--
शैलेंद्रानां, जेवि नृपानां जलकुंभानीं लोक ५५
जसें नरपती दाविति अपुली धनदौलत अणि रूप,
तसें गिरींद्र स्वाच्छाक्तातिघन नानाधातूरूप. ५६

श्लोक.

सारें झाकुनि टाकिले गगन हे मेघांचिये पंक्तिनीं,
तारा भास्कर दोन्हिही न दिसती संपूर्णही मेदिनी;
ओघांनीं नव वारिच्या जलधरीं संतृप्त केली असे,
गाढ ध्वांत नितांत हा पसरुनी दिग्लोप झाला दिसे. ५७

साकी.

उंच उंच गिरिशिखरें शोभति धुतलेली धारानीं,
विशाल आयत निर्झररूपीं नवमौक्तिकहारानीं. ५८
महागिरींच्या शिखरांवरुनी वेगानें पडताती,
जलौघ मोठे पुन्हा तयांच्या शिलातलीं आपटती. ५९
ज्यामधिं केकी केका करिती ऐशा शैल–गुहांत,
हार तोडुनी जणूं मौक्तिकें विमल विखुरलीं जात. ६०
त्वरित गतीनें खालीं येती स्रोत स्वच्छ जलांचे,
मोठे मोठे नव्हत स्रोत ते, मुक्ताकलाप साचे. ६१
गिरिशृंगांचीं तळें तयांनीं केली निर्मळ धुवुनी,
महागिरिगुहोत्संगतलानीं ठेवियले ते धरुनी. ६२

श्लोक.

दिक्‌भागीं आसमंतात् पडति अतुल ज्या तोयधारा असंख्य,
कंठीं स्वर्गस्त्रियांच्या रुळति विमल जे हार मोठे अमूल्य;
आमर्दे च्छिन्न होती निधुवनसमयीं मौक्तिकें त्यांतुनीही,
खालीं पृथ्वीवरी या पडति मज असें भासते; ना तुलाही ? ६३

पक्षी जाति निघोनि आप अपुल्या नीडामधें जेधवां,
जागोजागीं मिटोनि जाति कमलें सारी जधीं बांधवा;
तैशा सुंदर पावती विकसनां जेव्हां लतामालती,
गेला अस्तगिरीवरी तंव रवी सारे असें जाणती. ६४

गीष्मर्तूला जिंकुनी वारिदांनीं,
आकाशातें व्यापिलें विक्रमानीं;
होती आतां गर्जितें जीं तयांचीं
जाणों तूर्यें वाजती तज्जयाचीं. ६५

जहाली कोणती सिक्त । कोणती सिद्ध राहली,
भूची विद्युत्प्रकाशानें । दावी अंगे जणो घन. ६६

मालती कुरजा मोद । हारी पृष्टपयःकण,
लतालास्य कलाचार्य । वाहे वर्षासमीरण ६७

जसे जसे अंबुद गर्जताती,
वियोगिनी दुःखित भारि होती;
दुःखाग्निदग्धाप्रति शांतवाया,
ये मेघ हे भाषित होय वाया. ६८

श्लोक.

खालीं मही कर्दमयुक्त झाली,
धारा वरी वर्षत नीलदाली;

पाहोनि हे सेवकलोक सेवा--
चारी धरी मानसिं फार हेवा, ६९

सोडोनिया देति तुरंग रंग,
होती मदोन्मत्त करी कृशांग--
मार्गामधें स्यंदन मोडताती,
ते दंश लोकांप्रति पीडिताती. ७०

केला हरें निज पराभव जाणुनीया,
कोपें हटें मधु धनुप्रति फेकुनीया;
वर्षासखा कुसुमचाप तडिन्मिषानें,
कौक्षेयकासि फिरवी गमतें श्रमानें. ७१

साकी.

केका करिती मयूर अपुल्या उंच करोनी माना,
बोलाविति जणुं मुदें भेटण्या चिरसंगत जलदानां. ७२
उन्नत जलधर पाहुनि अथवा केकाव्याजें केकी,
' केव्हां आलां ' ऐसें त्यानां हर्षें पुसती जणुं कीं ? ७३
मयूर गाती गीतें वाजति घनगर्जित वाद्यें हीं,
तडिन्नर्तकी डोले नाचत गगन मंडपीं राही. ७४
जिकडे तिकडे नील हरित हें गवत उगवलें दाट,
नानापरिचीं शस्त्रें केला क्षिति--नारीनें थाट. ७५
बहु दिवसानीं स्वप्रिय जलधर आला निजगेहास,
झणुनी हार्षित होउनि भारी ल्यालीसें चोळीस. ७६
तुडंब भरलीं सरोवरेंहीं स्पर्धा करिती जणुं जीं,
वार्धीशीं जलभारें जणुं कीं अभ्रें गळलीं आजीं. ७७
वियोगिनींचीं नेत्रें आणी अभ्रें हीं आकाशीं,

स्पर्धेनें जणुं करित राहती अधिकाधिक वृष्टीशीं. ७८
संतत धारा वर्षित असतां जलधर विरुनी गेले,
वियोगिनीचें लावण्यचि तें नवल यांत हो! कसलें! ७९

आर्या.

भोगियली हरिणाक्षी जैशी युवती सुकान्त कान्तानें,
तैशी भूमि विराजे सिक्त असे जी नवाम्बुनिवहानें. ८०
कोठें भरी सरोवर पाण्यानें क्षेत्रवृंद वारिद हा,
कोठें भिजवी गात्राचि निष्फल दवडी कधीं न चैका हा. ८१

श्लोक.

स्वारी शिकारी मुळिं बंद झाल्या,
सर्वा नृपांच्या अयनींच ठेल्या--
सेना, जलानें विनिरुद्ध केलें—
मार्गास वैरासहि वर्षकालें. ८२

चढोनि जवन प्रभंजन हरीवरी अब्धर,
नृपाल सकला वनीं पतिवरेण्य हा जर्जर;
करी सकल मेदिनी सलिल तीव्र धाराशरीं,
कृषीवल सुखी करी दिनमणिप्रतापा हरी. ८३

राणी ज्याची प्रियतम तडित्, वाजिराजा प्रवात;
वेगीं—श्रेष्ठ त्रिभुवन जयीं शस्त्रधारा सुधौत,
यत्प्रासाद प्रथित असती मोठमोठे गिरीन्द्र,
बन्दी बर्ही सतत वितरो मेघभूपाल भद्र. ८४

अपूर्ण.

---

धूर्जटी.

## करुणाविलास.

### श्लोक.

झालें माझें हतबल पहा आज हें दैव काय,
गेलें गेलें त्यजुनि मजला योषितारत्न हाय;
आतां कोणा कथिशिल मना ! स्वास्थिती पूर्ण आधी,
बोलोनीया मधुर वचनें कोण वारील आधी. १

येतां गेहीं सविनय तुझी चारुमूर्ती सुशीले !
देई मोद स्मित मधुरशा वीक्षणी प्रेमशीले !
ती तूं मातें प्रणयमधुरे ! बोलुनी गोड बोल,
मच्चित्ताची शमविसि कशी ताप चिंता न बोल. २

गेले सारे विषय मतिला विस्मृती होय आजी;
गेली विद्या श्रम करुनिया मेळवीली असे जी;
माझ्या चित्तीं सतत वसते बालिका सारसाक्षी,
राहे जेवीं हृदयकमलीं देवता सर्वसाक्षी. ३

जेव्हां जाशी त्वरित चढुनी रम्य निर्वाणदेशीं,
तेव्हां केवीं बघ सहृदये ? सोडिसी तूं दयेसी;
नेत्रें आतां शमविति न हीं ताप माझ्या मनाचा,
प्रातःकाळीं हरण करितीं गर्व जीं पंकजांचा. ४

झाला माझ्याकडुनि सखये ! काय अन्याय घोर,
तेणें चित्तामधिं धरेसि तूं आपुल्या राग थोर;
नोहे सत्य प्रिय पतिरते ! गोष्ट केवीं घडे ही,
जाशी वेगें त्यजुनि मजला दूर तूं मुक्ति-गेहीं. ५

भोळ्या यत्नें चढलिस शिला तूं विवाहप्रसंगीं
घेसी माझा कर निजपदां सावराया शुभांगी !

ती तूं मातें गगनिं दयिते ! केविं जाशी त्यजोनी,
तेणें माझें हृदय शतधा जातसे हें उलोनी. ६

निर्दोषी जी मधुरसवती सद्गुणांभोजसार,
जीचे वर्ण श्रवणकमळां मोद देती अपार;
नानाभूषायुत रुचिर सत्काव्य देवीसमान,
कांता रम्या हृदय मम हें सोडुनी जातसे न. ७

झाली चिंता शमन मनिंची सर्व अम्भोरुहांची,
कांते ! शोभा अमित खुलली रम्य तारापतीची;
झाला सारा कलकल असा नाद या कोकिलांचा,
जेव्हां बाले ! वध करिसि तूं त्याग भू-मंडलाचा. ८

देसी कांहीं दिवस मजला राज्यभोगांसि कांते !
विद्युत्तेजासम विलसती लोल पृथ्वीतलीं ते,
लक्ष्मी जाई अनयपर भू-पाल सोडूनि जेवीं,
जासी कांते ! त्यजुनि मजला दुर्भगा हाय तेवीं. ९

एका कालीं तुजसह सखे ! सेवुनीया विलास,
काव्यें नव्यें सुरस रचिलीं त्यावरी गोड खास;
त्यावांचोनी मधुर कविता रम्य होईल कैसी,
बोले बाले ! प्रणयमधुरे ! सत्वरीं स्वर्ग-वासी. १०

बाले ! हास्यें तव मधुरशा शोभली मेदिनी ही,
जेणें वाटे मनिं विफलता सत्कवीतें जिची ही;
ती ही राका परिसुनि तुझ्या नाशवृत्तासि कांते !
आतां पाहे सहज मिरवी इंदिरा-वैभवातें ११

जीनें मंदास्मितरस-भरें सिंचिलें नित्य मातें,
हर्षोत्फुल्लीं नयनकमलीं पूजियेलें जयातें;

ती ही माझी परम विमला मंगला गेहदेवी,
नाहीं नाहीं हृदय-भुवना सोडुनी जात नाहीं. १२

संबोधोनी रमण सखि हा! नाथ ऐशा पदांहीं,
केली स्वर्गासम सुचरिते! रम्य सारी धरा ही;
आतां कांते? त्यजुनि मजला होउनी स्वर्गवासी,
येथें मातें खचित सुभगे! लोळवीसी धुळीसी. १३

लावण्याचा तुजसि विमले! वीट गे! काय आला,
या लोकींचा विनय गुण कां आज लोपोनि गेला;
केलें कांते! अशरण तुवां हाय! या सद्गुणातें,
जाशी केवीं अमर-सदना सोडुनी या जनातें. १४

हेमाहूनी सरस सखि हे! शोभली अंगकांती,
पाहोनीया अनल-ज शिखा लज्जिता होय चित्तीं;
क्रोधावेशें ह्मणुनि तुजला जाळिते काय सांगे,
अग्नि-ज्वाला अदयमतिनें अङ्गनेते! वरांगे. १५

हृत्तापानें हरण करुनी शांति दे लोचनाला,
अम्भोजांची सुखकर जणूं कंठसंलग्नमाला;
आनंदा दे नित मम मना काव्यदेवीसमान,
स्त्रीवृंदाचा ऋतवर अलंकार शोभायमान. १६

स्वप्नीं नाहीं कधिंहि धरिला वाकडा भाव चित्तीं,
नाहीं अन्यावरि वळविली आपुली प्रेमदृष्टी,
ती तूं आजी विमलचरिते! निर्गुणा भाळलीस,
सांगे मातें तुजसि रुचला केविं स्वर्लोक-वास. १७

शय्यागारीं सतत पतिच्या चिंतितानां गुणांस,
प्रेमोत्कर्षें परम हृदयीं मोद वाटे जियेस;

ती ही माझी हृदयकलिका नाशिली हाय ! काळें,
नाहीं आता मजजवळ हा ! एकही शब्द बोले. १८

प्रिया वीणा--वाणी मधुर अमृतस्यंदि सुखश्री,
बघोनी रूपातें कविवर अहो ! मान तुकवी;
तियेच्या वर्णाया करुणरस युक्ताद्भुत कृती,
अहो ! सांगा मातें कवण न पवे मोद सुमती. १९

अनंत विठ्ठल चित्रे

---

## " शारद–श्री. "

### श्लोक.

विशुद्ध जल निर्झर स्वन–भरें सुखें वाहती,
तडाग--सरिता--तटीं विहगवृंद हे पोहती;
सरोज–कुसुमें नवीं सुखद हीं फुलूं लागलीं,
सखे; हंसत ये जणूं रुचिर शारद–श्री भली. १

सुपल्लव–युता लता नयनरम्य ह्या जाहल्या,
शिरीं कुसुम–गुच्छ ठेवुनि जगूं सख्या पातल्या;
परस्पर पहा ! पहा ! दृढ मिठी कशा घालिती,
नसे प्रणय–बंध तो उकलितां कुणाची क्षिती. २

सुगंधयुत वायु हा करि प्रियांस रोमान्विता,
सशीत उपचार त्यागिति ह्मणून त्या तत्वतां;
करी मदन दीप्ति तो हळुहळू युवाभ्यंतरीं,
कुणास दिन हे सखे ! सुख न देति गे ! अंतरीं. ३

तृणांकुर नवे बहू डुलति काननीं हे इथें,
पहा ? मधुनि नीरही झुळु झुळू कसें वाहतें;

समान सिकता कुणी पसरली इथें ही बरें,
निसर्ग सखि खेळली खचित शेष हा तो उरे. ४

सुरम्य मृग--बालकें सुखभरें बहू हिंडलीं,
तदीय चरणाकृती उमटली पहा या स्थलीं;
" कुठें तरि कुठें " नको वदुं--हळूंच तीं हीं पहा ?
मृगें चकित गे ! तुलाच बघती मृगाक्षे ! अहा ! ! ५

प्रफुल्ल तरु जाहले रसिक भृंग त्या सेविती,
गळून पडतीं सुमें रुचिर जागजागीं सती;
प्रिये ! सुवनदेविच्या असति रंगवल्लीच या,
पहा ! दुरुनि मौज ही परि न हात लावी तया. ६

तृणें हरित त्यामधें विविध पुष्पचित्रावली,
स्वकीय कर कुंचली धरुनि सूर्य हा रंगवी;
असे क्षितिज ही मिती, कृति अशी न, ये मानवा,
कुणी पसरिला बरें हरित गालिचा हा नवा. ७

सरीं भरुन राहिलीं विकच पद्म पुष्पें किती,
किती मधुप हंस सेविति नसे तयांची मिती;
सुधाघटचि काय हे अखिल देव संप्राशिती,
कळे न मज काय कीं सकल स्वर्ग ये खालतीं. ८

तृणावरि चहूंकडे सलिलबिंदु जे सांचले,
खरींच नव देविचीं असति काय मुक्ताफलें;
किती चरण आपुले भिजुनि आर्द्र झाले प्रिये !
असेल सखिचें तुझ्या प्रथम काय आतिथ्य हें. ९

अहा कुठुनि येतसे श्रवण मंजु गोड ध्वनी,
हरी सकल ताप जो रमवि तोष देई मनीं;

बघूं चल ? सखे ! बघूं अहह ! काय पर्णध्वनि,
खराच वनदेविचा मधुर हाचि वीणाध्वनि. १०

बसूं क्षणभरीं इथें स्थल निवांत हें भासतें,
तुझ्याजवळिं निर्झरा रुचिर शांतता नांदते,
अखंड जल--निर्गमें सकल विश्व हें बोधिशी,
" गुणास न वय प्रमाण " निज तत्त्व हें दाविसी. ११

चराचरिं जिथें तिथें प्रणय पूर्णता पावली,
कुठून मग ती वसे विरुनि जाय तापावली;
असंख्य जइं प्रीतिच्या सुमलता डुलूं लागती,
तदीय कुसुमें अशीं पसरती जगाभोंवती. १२

जरोजवसनास सांवरित ज्या बहू लाजल्या,
प्रसन्न सरितातटीं तरुण सुंदरी पातल्या;
हळूच वदती मुखीं मधुर हांसती पाहती,
वरूनि सुरदेवि ह्या उतरल्या जणों खालती. १३

प्रभातसमयीं स्त्रिया करुनि मार्जनादिक्रिया,
स्वकंकण--रवें सडे कितिक घालिती सत्प्रिया;
सुहास्य--ललना गृहापुढति रंगवल्ली नव्या,
सुरम्य जणु रेखिती कनकरौप्य ताराच या. १४

नभीं विहगवृंद हे विहरतां बहू भागले.
तरू--शिरिं मुदें विशंकित मनें पुन्हा बैसले.
तिरस्कृति न जाहली; मधुफलें खगाला भलीं,
जडांत उपकारता दिसुनि नित्य येते भली. १५

---

द्वा. आ. तिवारी.

## कविता देवीस.

### श्लोक.

अहर्निश तुझें जरी करितसें अये ! चिंतन,
परंतु अजुनी कसें मज न देशि गे ! दर्शन !
खरोखरिच गे ! पुरें वनविलेंस वेडें मला,
सदोदित कुठें तरी हुडकितों पहा मी तुला. १

स्वकीय जन सोडुनी भटकतों, तुला धुंडितों,
पिशासम जनीं वनीं उपवनीं सुखें हिंडतों;
स्वसौख्य त्यजिलें कसें, कृश शरीर झालें पहा;
अजून सदये ! किती शिणविसी ? नको प्राण हा. २

किती शिणविलें, किती रडविलें जरी तूं मला;
तुझेंच चरणीं तरी खचित देह मी अर्पिला,
कुबेर धन घेउनी मजपुढें जरी पातला,
नको किमपि गे ! सखे ! तुजपुढें उणें तें मला. ३

मदीय मन मोहिलें प्रियसखे ! तुझ्या दर्शनीं,
नसे जगतिं याविणें खचित अन्य हेतू मनीं;
असे बहु चमत्कृतीयुत धरा जरी देवते !
परी तुजपुढें सखे ! मजसि तुच्छ ती वाटते. ४

वसंतसमयीं मही कुसुमभूषणें लेतसे,
प्रसन्न अरुणोदयीं सुख मनीं बहू होतसे;
मला गमतसें सवें विहग निर्झरां घेउनी,
वसंतयश गातसे तरुलतांतरीं बैसुनी. ५

सुमें विकसतीं, लता तरुसवें मुदें डोलती,
विहंग दयितांसवें मधुर राग आलापिती;

प्रसन्न हृदयें कुणी अळविती, कुणी वंदिती;
विलोकुनि अये ! तुझी रुचिर दिव्य रम्याकृति. ६

अशा समयिं मीं जधीं हुडकण्या तुला जातसें,
कुठें न दिससी ! तुझें मजसि सत्य लागे पिसें;
प्रसाद न घडे तुझ्या सुखद दर्शनाचा जरी,
कशास मग हें जिणें ! अहह ! भार हा भूवरी ! ७

अहो ! कवि ! तिनें तुह्मा कधिं तरी दिलें दर्शन ?
रसज्ञ सरिते ! तुला शिकविलें कुणी गायन ?
निसर्ग कविंनों ! कुणा मधुर गातसा गायनें !
वदा, मजसि दाखवा, विफल ना तरी हें जिणें. ८

असेल मरुता तिला कधिं तरी कुठें पाहिलें,
कृपा करुनि सांग बा ! अखिल विश्व तूं व्यापिलें
अहो ! विनवितों तुह्मा सकल देवतांनो ! किती,
कृपा करुनि दाखवा, मजसि भेटवा, ती सती. ९

निवास तव मानिनी मज न गे ! कुणी सांगतो,
गरीब दुबळा कवी विनवितों करां जोडितों;
प्रमाद घडला ह्मणो, करिशि कां अशी हेळना,
किती विनविलें दया अजुनि कां तुला येइ ना ? १०

विशाल गगनांगणीं, तव निवास तारांगणीं,
सुरेंद्रभुवनीं, मुनीजनगणीं, कुठें मानिनी,
अये ! विजन काननीं, परमदिव्यसिंहासनीं,
असे निकटवर्तिनी, हृदयवासिनी या जनीं. ११

जिच्यास्तव कसें तरी अजवरी जिणें कंठिलें,
तिनेंच मग शेवटीं मजसि हाय धिःकारिलें;

जरी कुपित जाहली जननि अंध बाळावरी,
तयें मरण वांछिलें नवल काय सांगा तरी! १२

के. ल. टेंभुर्णीकर.

---

## एक कोडें.

प्रसंग.– आषाढी अथवा कार्तिकी एकादशीला तुळशीबागेंत मोठी यात्रा भरते तेथें नाना तऱ्हेंचीं मातीचीं चित्रें लहान मुलांचीं खेळणीं वगैरे जिन्नस विकावयाला येत असतात हें पुष्कळांना माहीत आहे. अशा एका एकादशीला मुलीनें मातीचीं चित्रें घेऊन देण्याबद्दल आग्रह धरिला असतां तिचा व माझा झालेला संवाद खालील कवितेंत ग्रथित केला आहे.

### आर्या.

' एकादशी ह्मणोनी तुळशीबागेंत आज नेवोनी,
भाऊ! मज मातीचें द्या हो! द्या चित्र छान घेवोनी. १
' किति तरि चित्रें आलीं एकापेक्षांहि एक सुंदर तीं,
वाटे बघत बसावें लावुनि निजदृष्टि सर्व त्यांवरती. २
' ज्यांहीं कर्ण उभविले धरुनी एकेक पाय उचलोनी,
घोडे ऐसे बघतां शर्यत जणुं सोडिली गमे कोणीं. ३
' सरतां दिव्य परीक्षा गुरु शाळा जेविं सोडण्यापूर्वीं,
श्रृंगारल्या मुलांना करिति उभे अश्व भासती तेवीं. ४
' किंवा श्रीरामाची मोठी जी मिरवणूक निघणार,
तिजसाठीं हे वाटे असती कीं सज्ज करुनि श्रृंगार. ५
' ज्या निज पुच्छें मोदें पाठीवरि घेउनी उभारोनी,
घेती कानोसा जणुं टवकारुनि कान आपुले दोन्ही, ६
' ज्यांहीं मागें किंचित् माना मुरडोनि दृष्टि वळविल्या,
वाटे जणुं वत्सा कीं अवलोकाया समुत्सुका झाल्या, ७

‘ खुर उचालिले जयांनीं इच्छुनि जणुं काय भूमि उकराया,
ऐशा गायी कोण न होई उत्कंठ भाउ ! पाहाया ? ८
‘ कुंच्या पांघरलेलीं बाळें किति छान छान रेखीव,
मांडिलिं विकावयाला होतो ह्या हृष्ट पाहतां जीव. ९
‘ तैशीं रांगति बाळें केश जयांचे भुरू भुरू उडती,
असती; बघतां वाटे ध्यावीं उचलोनिया कडेवरतीं. १०
‘ बाई मम आईशी आहे घुसळीत ताक चरवींत,
बैसे बाळ जवळ तें मागे पसरोनि हात नवनीत. ११
‘ आलें आहे तेथें भाऊ हो ! एक चित्र किति नामी,
आजवरी कोठेंही केव्हां ही पाहिलें न त्यासम मीं. १२
‘ रडते बाई कोणी जवळ उभ्या असति राक्षसी दोन,
मारुति झाडावरुनी निरखी बाईस दृष्टि लावून. १३
‘ भाऊ ! चित्र कशाचें आहे हें मजसि आधिं सांगोनी,
या खेपेला मज द्या सुंदर नव चित्र तेंचि घेवोनी.’ १४
तेव्हां श्रीसीतेचें सारांशें म्यां पवित्र चारित्र्य,
सांगुनि सर्वेचि वदलों ‘ व्हावें तुज कासया असें चित्र ? १५
‘ देतों पैसे तुजला मी न ह्मणें नाहिं कीं पहा बाई !
मातीचीं चित्रें परि त्यांचीं बाळे ! न तूं कधीं घेई. १६
मातीच्या चित्रांची फुटतां होणार शेवटी माती,
देशिल फेंकुनि सारे तुकडे तूं रडत आपुल्या हातीं. १७
‘ घे चित्र साखरेचें घेशी जरि, कीं जरी उद्यां फुटलें,
हांसत भक्षण केलें वाया कांहीं न त्यांतलें गेलें. १८
‘ किंवा होइल त्याचा सुंदर पेला भरोनि एक चहा,
घेऊं आपण दोघें देऊं कोणा न एक थेंब पहा ! १९
‘ झालें ना ठरलें ना चल देतों चित्र गोड घेवोनी,’

वदलों ऐसें हांसत बालामधुमृदुकपोल चुंबोनी, २०
हळुच निवारुनि माझा कर तेव्हां बालिका वदे मज ती,
'खावोनि साखरेचीं चित्रें होणार काय तरि पुढती.?' २१

अनंततनय.

## गान्हाणें.

पद. ( चाल— "सुमनाच्या गर्भामाजी"—ठोंबरे. )

रात्रीं सुखशय्येवरतीं—
प्रेमाचीं स्वप्नें पडतीं,
गडबडुनी जागी होई,
हांसत मग सृष्टी पाहीं !
हृदयंगम ही मौज खरी,
सांगूं मी कोणास परी ? १

× × ×

क्षणभङ्गुर हें जग सारें—
दाविति जे आत्माचारें.
दंवबिंदू ते चमकून,
अनन्तांत होती लीन !
हृदयंगम ही मौज खरी,
सांगूं मी कोणास परी ? २

× + ×

"गेला तरि जावो प्राण—
प्रिय मम तें मी साधीन !"
गुंगत जननयनां—आड,
चुंबिति अलि सुमनें गोड !

हृदयंगम ही मौज खरी
सांगूं मी कोणास परी ? ३

× × ×

स्पर्श दिव्य होतां ज्याचा,
बनतो स्वर्गचि पृथिवीचा !
मधुर मनोहर संगीत,
खेळे वातावरणांत ! !
पुनित मन मम तेंच करी,
सांगूं हें कोणास परी ? ४

शाहू द. उजगरे.

## हृदयभेदन.

### श्लोक.

जाती धावत शैलनिर्झर वनीं स्वेच्छें सरित्संगमा,
देती पुष्पलता खुशाल तरुला विश्रब्ध आलिंगन;
विद्युन्मेघ मिळून रम्य करिती व्योमांगणीं नर्तन,
स्वैरालाप सरोजिनीसह सदा चाले अलीचा पहा ! १
तारा आणि विधु प्रशांत गगनीं गातात गीतें किती,
चंडांशु प्रणयच्छटा उमटवी गालीं उषेच्या नव;
वायूची लहरी करी हितगुजें शैलासवें सर्वदा,
पद्में हीं हंसती क्षणांत रुसती प्रेमें तडागावरी ! २
विश्वांत प्रणयी सुखें विहरती सर्वत्र ऐसें दिसें,
प्रीतीचा सुविलास अप्रतिहत प्राणेश्वरी ! चालला;
नाहीं होत कदापि लौकिकभयें प्रेमाश्रुसंरोधन,
औदास्यें अथवा कधीं न दिसती निस्तेज हास्यच्छटा ! ३

आनंदें उघडें करून हृदय प्रेयास आलापणें,
स्वच्छंदें करणें विहार सखये! सोत्कंठ त्याच्यासवें;
प्रीतीचें फल काय याहुनि दुजें लोकांत आहे बरें?
नाहीं प्रेयसि! हाय हाय! पण हें दैवांत माझ्या सुख! ४
तूं माझी, परि दैवदुर्विलसितें नाहींस माझी अतां,
हा! हा! दृष्टिहि फेकणें तुजकडे चोरीच झाली खरी!
प्रेमालाप तुझ्यासवें मग गडे! कोठून व्हावा बरें,
स्पर्शाची तर आसही जळुनिया केव्हांच गेली असे! ५
अंधारांत बसून नित्य करितों नेत्रांबुसंवर्षण
हा दुष्ट व्यवहार अश्रुहि मला ढाळूं न देतो पहा!
झालें शुष्क शरीर, दग्ध हृदयीं शोकानलें जाहलों,
उत्कंठा पण गे! तुझ्याविषयिंची आहेच ही वाढते! ६

रेंदाळकर.

---

## प्रेम.

( चालः— चंद्रकांत राजाची कन्या. )

कुसुमाहुनि मृदु अंतरिं विलसें काय मोदकारी?
धवल चंद्रिकेहुनी विमल तें उज्ज्वल भानुपरी, १
शुभ्र कीर्ति जें दिगंतिं पसरी, अजिंक्य होइ परी,
उज्ज्वल—निर्मल—मृदुलतरहृदीं निवास सतत करी. २
मंदानिल--विजित मृदुलहरी हास्य सरीं करिती,
शशी विलोकुनि कौमुदिला त्या आलिंगन देती— ३
अनुपम तैसें मृदुहृदिं विहरुनि हास्य करीं श्वसनीं,
विलोकुनी मनसेप्सितस्थल हो! आतुर मोहोनी. ४
चिरसौख्यामधिं विरह कधीं दे, उत्सुक करि भुवनीं,

अनंत ईशा दावी केव्हां चिरसुख वितरोनी. ५
सुजन बोलती 'प्रेम' अंतरीं विलसे तें जगतीं,
निर्मल करुनी हृदय, सुजनता नरांस दे अंतीं. ६
प्रणयिजनांतरिं विलसित जें 'तत्प्रतिध्वनी' वदती,
'कलिका' कोणी 'कुसुमें' कोणी नाम तयां देती. ७
'प्रतिबिंब' तयां प्रणयीहृदगत कवि कोणी वदती,
प्रेमीमीलन होतां करि तें अश्रु--कुसुम--वृष्टी. ८
'प्रतिध्वनी' ते दोन निनादुनि सूर निघे एक,
विलीन होउनि मीलन होई प्रेमाचें एक. ९
जननी बालांवरी, बंधु ही भगिनिवरी वितरी,
पति पत्नीवरि, कवि कवितेवरि प्रेमराशि भारी. १०
सोडुनि जातां अवनीला शशि निस्तेजहि होई,
त्यजुनी जीवित मधुकर कमलीं स्वर्सुख ही सेवी. ११
'प्रेम' नच तरी काय सुजन! तें सांगा या कविला,
वृत्ती खुलली!! नितान्त भुलली!! 'प्रेम' दिसे मजला. १२

शंकर.

(श्लोक.) भूतदयेचे अश्रु.

रत्नें उज्ज्वल भूपकुंडलिं किती आंदोलती चंचल,
मुक्ताहार रुळे मनोज्ञ तरुणी वक्षःप्रदेशावरी;
उल्हासें हिंमबिन्दुही चमकती अंभोजपत्रीं कसे,
नील व्योमतलीं अनंत हसती चेतोहरा तारका.
येती जे परदुःखतप्तनयनीं उष्णाश्रुबिंदू पण,
वाटे त्यांपुढतीं मला खचित हें सारेंहि निस्सारसें! १

रेंदाळकर.

# काव्यरत्नावली.



## अंक ७ वा.

## वर्णमालिकाबद्ध-परमेशस्तवन.

### आर्या.

अयि ! दीनबंधु ! करितों मी त्वत्पादांस क्षिप्र सन्नमन,
सर्वज्ञा ! तुज गाया राहों माझें स्थिर प्रसन्न मन. १
आकर तूं करुणेचा, विश्वगुरो ! असासि सर्वदां साचा;
आलों शरण ह्मणूनी वाहसि गा ! भार सर्व दासांचा ! २
इतर न येती कामा, येतें त्वन्नाम जेविं बा धात्यीं;
नाम तुझें ज्या वदनीं माया कृत्या करी न बाधा त्या. ३
ईशा ! त्वन्नामावलि मावलि आह्मांसि नित्य सुखवि खरी;
कोण हिच्याविण बाळां सांग दयाळा जनांत सुख वितरी ? ४
उदरंभरणार्थ अगा ! व्यर्थायुक्षर्पण हो न बापा हे;
दीनाला, हीनाला, पदलीना, बालकासि बा ! पाहें. ५
ऊर्मी भवसागरिच्या बुडतों यामाजि, काढि बाहेर;
हा दीनदास, यास प्रेमामृत दृष्टिनेंचि बा ! हेर. ६
ऋषि-पुंगव ह्मणाति मुखें “ ज्ञातुमशक्य ” खरा न वर्णवतो--
महिमा तंव विश्वगुरो, वर्णीतिल मत्स्य काय अर्णव तो ” ? ७
एका स्वर्णावांचुनि ह्मणती ज्ञाते न भिन्न नग मोहें;
तैसें दृश्य सकल मज तुजविण सदया ! दुजेंचि न गमो हें ८

---

१ हे परमेशा २ मायारूपी राक्षसी ३ विस्मृत करी ? ४ व्यर्थ आयुष्य जाणें ५ लाडा. ६ मुनि श्रेष्ठ.

ऐसा कोण कृपाळू तुजविण जो पुरवि काम दासांचा,
कल्पतरूही लाजे तुजपुढती सर्व[1]—कामदा साचा. ९

" ओ " ह्मणतोसि तयातें व्यसनीं[2] जो दीन दास हाकारी[3],
कोण सख्या ! तुजवांचुनि आह्मां दीनांस तो सहकारी. १०

औदासिन्य उपजतें करिती षडरी ह्मणूनि हा निर्झर[4];
नागविलें जग येणें यासम न दुजें जनांत हानि—कर. ११

अंबा निज तनयाचें झिडुनि स्वागें करीत जेवीं हित;
तेवीं निजदासाचें करिशी सर्वहि असेल जें विहित. १२

अस्ता जाई सविता तेवीं हें विषयजात जायाचें;
ऐसें समजुनि मानस दास्य वरु न पुत्र वित्त जायांचें[5] १३

करुणासागर ! राहि न माझें बा ! क्षणभरीं अधीन मन;
व्हाया तव पदपद्मीं रक्त तुला मी करीं अर्धीं नमन. १४

खरतर कामक्रोधाद्यहि[6] वमती तीव्र हाय हळहळ तें;
पाहुनि बापा यातें मानस माझें बहूत हळहळतें ! १५

गजर तुझ्या नामाचा ज्याच्या मुखिं पावतो सदा शिव तो !
खल अति तापद कलि त्या तंव दासातें न सौख्यदा शिवतो १६

घन अज्ञानतमातें नाशी हे ज्ञानभास्करा देवा;
सेवा दे पायांची, त्यापरि दे नित्य भक्तिचा मेवा १७

चरण युगुल[7] दर्शन तें घ्यायाला योग्य काय मी नाहीं ? ! !
अकूप तडाग होतां करणें तें काय ? सांग मीनांहीं ! १८

छत्रादिक मज नलगे दे पादद्वंद्व ते अगा धात्या;
पूर्ण कृपेनें त्यांच्या पाहिन तुजला सदा अगाधा[8] ! त्या. १९

---

1 कल्पतरूचें विष० २ संकटीं ३ हाकमारितो ४ भडिमार ५ स्त्रियांचें ६ कामक्रोधादिसर्प ( अहि=सर्प ) ७ चरणद्वय ८ अगाध अशा.

जर्जर झालों दुःखें भवसागर हा प्रभो ! असामान्य,
झाला न काय अजुनी दीन तुला बाळ हा असा मान्य. २०
झष[1] उदकाविण तेवीं तव करुणेवीण बाल कळकळतें; !
काय दयासिंधु अगा ! अधिक कथों हें तुला सकळ कळतें ! २१
टपुनी मन हें बैसों त्वद्गुणचरिता सदाहि देवाजी !
मग मी बोलुं कशाला छत्रचवरसहित मजलि दे वाजी. २२
ठक विषयी जन ठकवुनि घालिति हा ! हाय ! ! खास नरकास;
भवसागर तरण्याला कवणाची मी धरूं प्रभो ! कास. २३
डमरूधरशिव जेवीं घेई त्वन्नाम मंगलायतन;
तेवीं मानसिं राहो नाम तुझें हेंचि आमुचें वतन[2] ! २४
ढग आवृत[3] करि सर्वभासक[4] तो विश्वचक्षु जेविं रवी;
स्वस्वरूपा[5]—अज्ञानाचि तेविं सख्या मुख्य कार्य जें त्रिवी[6] २५
तरुणीजन—धन मन हें मोहिति ह्या लागु आग मोहाला;
सदय हृदय चुकवाया शक्त खरा तूंचि आमुच्या हाला. २६
थरथर कांपविते मत्प्राक्कर्मचि[7] ह्मणु कठीण कां पविते[8] ?
ताप विते नैकविधे प्रासंगीं[9] बहुत हाय ! ! तापवितें. २७
दर्शन दे बालातें परमप्रेमास्पदा रमांजाने[10] !
ह्मणतों करुणरवें कीं विलया खलवृत्ति सकळ माझ्या नें. २८
धनुशरसह काम महा व्याध मला सिद्ध मारण्या हरिणा;
शरणागता नता मज; हे तारक शीघ्र शीघ्र भयहरणा ! २९
न करिशी जरि करुणा विश्वश्वर बालकीं दयाळो ! हे;
काय करावें सांगा त्यजितां परिसें प्रभो ! दया लोहें ? ३०

---

१ मच्छ २ वतनदारी. ३ आच्छादितो ४ सर्व भासविणारा ५ आत्मस्वरूपा ६ नाशी ७ प्राचीन कर्म ८ वज्राते ९ अनेकविध प्रसंगीं १० रमा पते ( प्रभो )

पतित जनां ताराया धरिली बुध ह्मणति साच पावनता,
हें जरि खरें तरि सख्या! झडकरिं तूं पामरासि पाव नता. ३१
फणि काढुनि बसला जो काळ महा व्याळ तो करी लगट!
कर करुणा ना तरि हा केव्हां न कळे मला करील गट!! ३२
बक मीनां काळ तसे सकळ विषय नित्य तापदायि खरें;
आधीं पीयूषोपम[1] अंतीं न तसे अगा प्रभो! विखें रे! ३३
"भयकर–संसारे, इह त्राहि मुरारे! शरण्ये[2]' गा! ब्राळ;
पूर्ण प्रसादभाजन[3] हा जन हो, हो न जगतिं गाबाळ[4]! ३४
मग काय कमी वरदा, झाला तरि तूं प्रसन्न सांग मला;
परि अझुनी दीन तुला तुच्छचि हा सत्य बाल कां गमला? ३५
यमनियमान्वित नाहीं त्यागावें तरि तुवां न दीनातें.
होउनि निष्ठुर सागर टाकी कां सांग तें नदीनातें? ३६
रक्षक तूं दासांचा साचा सर्वत्र कथिति हा नियम;
त्वद्दासांना सांना[5] दूर असो परि करी न हानि यम* ३७
ळवळव झडो अहंता! नामामृतधार वदनिं संतत, ती–
झरझर पडो कृपाला! लुब्ध जिव्हा होइ नित्य संत–तती[6] ३८
वनसंचार नको मग नाम मुखीं जरि असेल पावन गा!
टाकुनि हें सुरतरूंच्या[7] कोण सुधी[8] मग ह्मणेल 'पाव नगा[9]' ३९
शरण पदांला झालों कल्पद्रुम सर्वकाळ जीवा हे,
यावांचुनि कोण सखा या जगतीं सर्व काळजी वाहे. ४०
षट्पदमन पदपद्मां नित्य वरो हें तुझ्या अगा! परमा;

---

१ विष. २ शरण येण्यास योग्य. ३ प्रसाद पात्र. ४ यःकश्चित्. ५ लहानसा (क्षुद्र) ६ सज्जन पंक्ति. (तती–पंक्ति) * अन्वयार्थः– त्वद्दासांना साना (क्षुद्र, तर एकीकडेच असो पण) यम (हि) हानि न करी. ७ कल्पवृक्षास. ८ ज्ञाता. ९ हे प्रभो.

जाणुनि पदवी यांची सेवी जायास नित्य ताप रमा ! ४१
सर्वेश्वर कळकळुनी ह्मणतों ' प्रभु तार दीन जो त्यातें
नच तारिशील तरि मज—सम कां पाषाण नसति जोत्यातें ' ! ४२
१तळहळ एक हरी हे, दास तुला साच नित्य तो याची,
मेघाविण चातकमुखिं कोण करिल सांग वृष्टि तोयाची ! ४३
क्षणभरि रडतां निजशिशु द्रवुनी ती धाव घेइ आइ कशी ?
सर्वज्ञा ! धाव २रुया ! बडबडणें मात्र काय आयिकशी ! ४४
२विनंति करी हा बालक जोडुनि मोदें स्वकीय अञ्जलि हो !
न लिहों दुजें परि तुझें चरित्र मम नित्य हस्तकञ्ज लिहो. ४५

श्लोक.

संसारीं तनु ३कावली ह्मणुनि दे आह्मांस नामावलि;
बालातें करि सांवली सदय ती साची असे मावली.
ती आतां जरि पावली तरि तुझ्या येऊंच कीं पावलीं !
नाहीं ती जरि पातली तरि अह्मां बा ! कोण या भूतलीं ! ४६
" वासुदेवास " दे वास वासना४जालभंजना,
चरणीं; मनीं तें राहों त्वन्नाम भव—गंजना५. ४७

—— वासुदेव राजाराम निसाळ.

## वर्षर्तुवर्णन.

( मागील अंकावरून पुढें चालू )

श्लोक.

शर्मांभोधररूप कुंजर पुरोभागीं असे चालला,
ज्याच्या दीप्तिमतीपुढें फडकते रम्या ध्वजा चंचला;

---

१ तळमळ. २ विनंति. ३ त्रासली. ४ वासनारूप जाळें खंडण करणाऱ्या ! ५ संसार छेदका. ( गंजन—छळ. )

वाजे दुंदुभिमेघ घोर रव हा, आला नृपाच्या सम,
तेजस्वी प्रिय कामुकास अति जो वर्षर्तुचा मोसम. ८५

जीची कान्ति नितान्त नील दिसते शामाब्जपत्रांसम,
कोठें कज्जलराशि–संन्निभ कुठें क्षौमप्रसूनोत्तम;
कोठें संभृत–गर्भ–कामिनिकुचाग्रासारखी श्यामल,
ऐशी आक्रमिते महांबुदतती सारें नभोमंडल. ८६

ओतप्रोत भरोनि निर्मल जलीं व्योमांगणीं रांगती,
तृष्णापीडित मुक्तकंठ जल ज्या सारंग ते मागती;
ज्यांचे कर्णमनोरम–स्वन अती वारीस ज्या वर्षती,
ऐशा मंदगती बलाहक–तती देखे लुलाय–द्युती. ८७

यद्भेरीं अशनिध्वनी झडतसे कोदंड इंद्रायुध,
घेऊनी चपला गुणा चढवुनी हें वीरसें अंबुद;
धारारूप सुतीक्ष्ण बाणनिकरीं विंधूनियां मानसें,
पाथांचीं, अतिदुःख देति निकरें माया दया त्या नसे. ८८

तृणांकुरतती जिच्यावर विरूढ झाली निळी,
तिनें अणि विनिर्गतप्रचुर कंदलींच्या दलीं;
किती निचित शोभते बहल इंद्रगोपान्विता,
मनोज्ञरमणीपरी विविधरत्नभूषांचिता. ८९

जातीनें रमणीय मोर करिती सानंद केकारव,
ज्यांची प्रीतिमहोत्सवीं पसरुनी सारा पिसारा नव;
लांडोरी–मुखचुंबनीं अणि तदाश्लेषीं समुत्कंठित,
संवेगें करितात नृत्य विपिनीं प्रेमोद्गमें सांप्रत. ९०

प्रवृद्ध–रवसाकुलाविलजला तटस्थ द्रुमा,
समूल उपटोनिया विविध दावुनी विभ्रमा;

प्रियास मिळती जशा तरुण कामिनी स्वैरिणी,
तशा द्रुतगती पयोनिधिस याहि कल्लोलिनी. ९१

तृणें उगवलीं निळीं विपुल कोमलें चित्रित,
मुखीं मृगकदंबकीं जिथलि केलिसंखंडित;
जिथें द्रुमततीं बहू विलसते नव्या पल्लवीं,
अशीं जनमनें हरी अति मनोज्ञ विंध्याटवी. ९२

ज्यांचीं चंचल चारुनेत्रनलिनी रम्यावनें शोभती,
आसोपास जईं कुरंगक--कुलें भीत्रस्त संचारती;
ऐशीं शैवलिनी वनें जन--मनीं औत्सुक्य उत्पादिती,
प्रेक्षोनी तरुणी जयां विरहिणी दुःखासवें ढाळिती; ९३

वारंवार जरी पयोधर नभीं घोरस्वरें गर्जिती,
गाढध्वांत नितांत भीषण निशाकालींहि मार्गाप्रती;
रागें पाहत चालल्या अचिरभा--तेजें प्रियाकांक्षिणी,
या संकेतनिकेतनीं न धरितां भीतीस सीमन्तिनी. ९४

सितोत्पलविडम्बि हे जलद ज्यांतलें चुंबिती,
शिलानिकर, निर्झर प्रचुर ज्यावरी वाहती;
शिखावल जयावरी बहुल संमदें नाचती,
समुत्सुक करीति हे कुधर लोकचित्ताप्रती. ९५

जो नीपार्जुनसर्जकेतकितरू हे गद्गदा हालवी,
त्यांच्याची कुसुमांचिया परिमलें सौगंध्य विस्तारवी;
साम्बम्भोद--समागमें शिशिर जो वाहे असा मारुत,
उत्कंठान्वित चित्त तो न करितो कोणाचियें निश्चित. ९६

ज्यांचे केश नितान्त नील अलिसे श्रेणीतटीं लोंबती,
त्यामध्यें सुरभि--प्रसून--रचिता गुच्छास ज्या घालिती,

हारांनीं स्तनमंडलें सजविती आस्यांबुजें खींधुनी,
ऐशा सुंदर कामिनी युव--मनां प्रीतीस देती क्षणीं. ९७

जलाच्या भारानें विनत दिसती जे जलधर,
विजेच्या तेजें ते अणि हरि--धनुष्यें सुरुचिर;
कटीं, कांची, कर्णीं मणिखचित ताटंकयुगुलें,
जयांच्या त्या रामा हरिति पथिकांचें मन बळें. ९८

माला केतकि--नीप--वंजुल--सुमें गुंफोनिया त्यांचिया,
वेणीमाजि निवेशिती बहुत या चित्तांत हर्षोनिया;
स्वेच्छेनें गुफुनी सुरेख कलिका इंद्रद्रुमाच्या करीं,
त्यांचे ते अवतंस आजि धरिती योषा स्वकर्णींपरी; ९९

लम्बाभोंद--गभीरभीषण--रवा ऐकोनिया मानिनी,
शंपाप्रस्फुरणीं प्रभूत चकिता उद्विग्न झाल्या मनीं.
मान त्यागुनि तत्कृता विसरुनी आगा समाश्लेषिती,
रात्रींच्या समयीं प्रियांस शयनीं सांडोनि लज्जेप्रती. १००

फुल्लेंदीवर--तुल्य कान्ति नयनद्वंदाश्रुच्या बिंदुनीं,
यद्बिंबाधरचारुपल्लव बहू जा ताति कोमेजुनी;
माल्यें आभरणें न लेति तनुतें ना चंदनें चर्चिती,
केल्या सर्व निराश वृष्टिसमयें पांथस्त्रिया संप्रतीं. १०१

नाना कीटककत्तृणें मिसळली ज्यांच्यामधें धूळ ती,
पानें शुष्क इतस्ततां पसरलें सर्पाप्रती यद्गती;
भीतिव्याकुलचित्त दर्दुरकुलीं जें प्रेक्षिलें आविल,
वाहे तें नव वेगवत् अभिमुखीं निम्नप्रदेशीं जल. १०२

गेलीं सर्व गळोनि पत्रकुसुमें जीचीं अशी पद्मिनी,
टाकोनी भ्रमरावली करित जी रुंजी श्रवोन्मादिनी;

हर्षें नृत्य करीति मोर वनिं जे त्यांच्या पिसाऱ्यावरी,
जाते जाणुनि ती नवोत्पलचि हे संमूढाचित्ता खरी. १०३

शोभे ज्यांचि कपोलपाळि विमला नीलोत्पलाचे परी,
वाहे तीवरि दान--वारि बसुनी पीताति भृंगावली;
वारंवार असे प्रमत्त गज हे रानांतले गर्जती,
नव्यांभोघर तूल्य घोर निनदें शैलीं वनीं हिंडती. १०४

अंगें चर्चिति ज्या रसीं मलयजीं घालोनि कृष्णागरा,
पुष्पांनीं निजकेशपाश सुरभी केला ज्यानीं खरा;
मेघांच्या ध्वनिला प्रदोषसमयीं ऐकोनि त्या योषिता,
जाती सत्वर सोडुनी गुरुगृहां शय्यानिकेतीं अतां. १०५

फुल्लेंदीवरपत्रशोभि घन हे अंभोभरें लोंबती,
वातें हालावितां सुमंद गतिनें व्योमांतरीं चालती;
याहीं सेंद्रशरासनांहिं हरिली मार्गस्थ सीमंतिनी—
चित्तें, तद्विरहाकुला असति ज्या भासे असें मन्मनीं. १०६

सारा ताप नवीन मेघसलिलासेकें लया पावला,
ज्याचा हा विपिनान्त नीपकुसुमीं साल्हादसा वाटला;
यच्छाखा हलवी समीर तरुनीं ऐशा जणूं नाचतो,
पुष्पांनीं सखि ! केतकीतरुचिया वाटे मला हांसतो. १०७

माला मंजुल—मालती—सुमचिता नारीशिरीं घालितो,
ताजी वन्य सुमें सुरम्य मुकुलें जाईचिही ठेवितो;
कर्णांती रचिभूषणें विकसिती कादंबपुष्पीं पहा,
कांताचे पदिं आंबुदौघ नटवी योषाजनां काल हा. १०८

पीनोत्तुंग—सुवर्तुल—स्तनशिरीं नारींचिया रूळती—
मुक्ताहार; सुसूक्ष्म शुभ्रवसनें श्रेणीतटीं शोभती,

रोमांच्या वळि नव्य शीतसलिलासेकोद्भवा राजते;
शोभाढ्यत्रिवळीं विभंग सुषुमीं मध्यप्रदेशांत ते. १०९

नवजलकणसंगें शीतता ज्यास आली,
कुसुमभरनतां जो डोलवी पादपाली;
बहुत सुरभिगंधी केतकीच्या परागीं,
करि विरहि जनांची वात चित्तें विरागी. ११०

विंध्यें आश्रय दीधला जलभराऽनम्रा अह्मांला शिरीं,
झाला ताप तया निदाघसमयीं अत्युग्र भास्वत्करीं;
फेडाया उपकार तत्कृत असें जाणोनि मेघावली,
देते हर्ष जणूं तयास सलिलें वर्षोनि त्याच्यावरी. १११

कान्ताचित्त हरी स्वसद्गुणभरीं जो भारि शोभा धरीं,
आहे जो सकला तरुव्रततिनां निष्काम मित्रापरी;
प्राण्यांचा जणुं जीव केवळ असे वर्षर्तुचा दिष्ट हा,
देवो मोद तुह्मास भव्यहि करो ना हो कदाऽभीष्ट हा. ११२

संपूर्ण.

धूर्जटि.

## सूर्यदर्शन.

श्लोक.

गेला निशाभर पहा चमके उषा ही
सृष्टिस्नुषा मग कशी शयनींच राही
केला तिनें सकल हा परिवार जागा
आज्ञा करी झडकरी निजकामिं लागा. १

स्थित्यंतरें अखिलशांतजगत्प्रकर्षे
केला प्रवेश मग जीवमनीं सहर्षे

वृशस्थ सर्व खग हे जगदीशगानें
नादाविती स्थल जणों अपुल्या सुरानें २

भासे विहंगमसमूह ह्मणे न गाणीं
वृक्षाश्रितां जणुं लतांस फुटे सुवाणी
विश्वप्रकाशददिवाकर आळवीती
कार्यीं समर्थ कर दैनिक याचिताती ३

होऊन तुष्ट कवनें, रवि, मोदकारी
त्यां दर्शनार्थ निघण्यास करी तयारी
शुक्रें तदागमनचिन्ह तदीय दूतें
पूर्वागमें सुचविलें अखिलांस हो तें ४

व्योमीं बघून तम भार्गवशत्रुदूता
येईल तूर्ण, ह्मणुनी बहु भी, निहन्ता
त्याची धृती वदनभा मग दूर गेल्या
भागीरथीहि यमुना जणुं एक झाल्या ५

सप्तास्यसप्तिरथसारथिसूरसूत
येतां क्षणींच गगनीं जनदृष्टिपूत
होईल आगम तुझा, गिरिकंदरींत
त्वच्छत्रु जाणुनि कसा पळतो त्वरीत ६

शास्ता नसे जंव नभीं निजतंत्रतेनें
तारासमूह करि राज्य अहंपणानें
येतां प्रतापनिधि तूं तंव तोच मित्रा
होई सुनम्र लववून तुला स्ववक्त्रा ७

भानो ! त्वदीय उदयें बघ सृष्टि धाली
टाकून कृष्णवसना जणुं पीत ल्याली

व्याघ्रादि हिंस्र पळती नगगव्हरांत
भक्ष्यार्थ सर्व फिरती द्विज काननांत ८

लुब्ध द्विरेफ नलिनींतुनि मुक्त झाले
सानंद होउन जवें घरव्यांस गेले
होई विकास दिसतां कमलांस कां तूं
जाणें न हा तव तदीयहि कोऽपि हेतुः ९

येशी जसा वरिवरी अति सावकाश
भासे जनां प्रखर तापद तो प्रकाश
भास्वान्प्रभाकर दिवाकर योग्य नामें
संबोधिलीं मुनिगणीं तुज पूर्णकामें १०

ज्योतींत सर्व, अतिभायुत तो रवी मी
जिष्णूस विष्णु वदला ऋततत्त्वगामी
विद्वज्जनांस कळलें तव हें महत्त्व
आहे तुझ्यांत परमेशविभूतिमत्त्व ११

अस्तीं तसाच उदयीं सम राहशी तूं
भानो! स्वयें मनुज देखति नात्र किंतू
तैसेचि संतजन संपदिं वा विपत्तीं
धैर्या न टाकिति धरीतिच सत्य रीति १२

कर्मे करी मनुज गुप्त गमे न लक्षी
कोणी परी असासि तूं जनकर्मसाक्षी
प्रद्योतना दिनमणे! जगतीं विसावा
ठावा नसे तुज मुळीं जनिं बोध घ्यावा १३

ज्या ज्या गृहीं नच घडे तव रे! प्रवेश
तेथें शिरे झडकरी बघ आतुरेश

जीवांस चक्षु असशी जगतींच नित्य
आत्मा तदीय वदती जन तूंच सत्य १४

तेजापुढें तव टिकाव न मानवांचे
कृत्रीम दीप धरिती जरि ते विजेचे
सर्पाशना मशकसंघ हरूं पहातो
तत्तुल्य तो बहु झटे तरि काय होतो? १५

आल्हाद शीतकिरणें विधु दे मनास
त्वद्रश्मितप्त ह्मणुनी गमतें जनांस
विश्वास चालक खरोखर तूंच एक
तेजोष्णताप्रद असें बवतात लोक १६

उष्णांशु सागरजलस्थिति पालटून
देती पहा गगनिं त्या मग पाठवून
पावे नवीन घनसें जल रूप तेथें
नांवें तया अखिल बोधिति मेघ येथें १७

आनंदमग्न अथवा व्यसनार्त लोक
होण्यास कारण रवें! जगिं तूंच एक
स्नेहार्द्र वारिद जरी अवनीं न अम्बु
वर्षी तरी पडतसे मनुजांबकांबु १८

वस्तूंस देशि किरणें निज भिन्न रंग
ज्यां पाहतां जन तटस्थहि होय दंग
आहे जसा तुज तसा सम रंक राव
देशी प्रकाश सकलां नच भिन्नभाव १९

स्थापून अद्रिशिखरीं घनमंडलाला
होती न वा करिशि तूं जणुं शृंगमाला

आकर्षणें गिरिशिरें बघ कोरियेलीं
चाले अशी सतत ही तव शक्तिकेली २०

ऐसे विशाल करुनी नग तूं सपाट
त्यां लाविशील धरण्यास समुद्रवाट
कालांतरें बहु तिथें मग पाहशील
जीवांस तूंच तव कामगिरी विशाल २१

होती तुझे किरण तापद उष्णकाळीं
तैसे जनां सुखद भासति शीतकाळीं
केलें तुलाच मनुजें जगतीं चितारी
नानापरी अससि तूं उपयोगकारी २२

वर्षाऋतूंत तव तेज पडे पयोदीं
पावे परावृत सुरेश्वर चाप दावी
त्वत्तेजसागर गमे जरि एकवर्ण
तानापिजाहि अनिमिश्रितसप्तवर्ण २३

व्योमीं सदा विलसतो तव दीप्तगोल
चंडांशु भासवि जनां जणुं अग्निगोल
लोहादि तप्त असती तुजमाजि धातू
रस्त्यादि निर्जिव जसे जडही तसा तूं २४

ऐसा परी अससि तूं घनवायुरूप
दुर्बीण दाखवि असें तव मध्यरूप
आहेत त्यांत खळगे बहु खोल मानें
होती तुझ्यांत वदती ज़न कीं तुफानें २५

वाटवावरें ज्या तुज वेष्टियेलें
त्वत्तेज त्यानेंच कवोष्ण केलें

क्षोणीवरी जें तव तेज येई
अब्जांश त्यांतील विभाग होई २६

पृथ्वीहुनी असासि तूं जरि फार मोठा
आहेस लांब ह्मणुनी दिसतोस छोटा
ऐशा करूं वसुधरा जंव लक्ष तेरा
एकत्र होइल तदा तव गोल डेरा २७

ग्रहोपग्रहांचा जरी गोल केला
न हो योग्य तोही तुझ्याशीं तुलेला
प्रभायुक्त मात्र प्रभो! तूंच जाण
धन्यांना धनाची पडे काय वाण २८

नाहीं तुला विधुसमक्षयवृद्धि पूषा
सर्व ग्रहां पुरविशी निजतेजभूषा
तेजामुळें ग्रह जनां तव दृश्य होत
सत्ता तयांवर तुझी चिरकालभूत २९

ज्योतिर्विदें कथियला तव भव्यगोल
आले भवां ग्रह तुझ्यांतुन अष्टगोल
येप्चून तो त्यजुनियां तुज आधिं गेला
तद्बंधुनीं पथ तदीयच आक्रमीला ३०

आकर्षिशी जरि करीं बहु ताडिशी त्यां
संतप्त होउन जरी वर कोपशी त्यां
चाले असा बहु तुझा चिरकाल ओढा
येई कसा परत जो गिरिमुक्त ओढा ३१

ईशें तयां गति दिली सरला स्वयें ती
आकर्षिशी ह्मणुनि भासत दीर्घवृत्ती

स्वांगप्रदक्षिण असा सह सूर्यमाला
शौरीकडे धरुन तूं करिशी गमाला ३२
आकर्षितों परि न ये मम पुत्र कोणी
आज्ञा मदीय सुतही मनिं काय नाणी
आहे अशी तव मनीं बहु नित्य चिंता
चिंता नव्हे मज गमे तव भानिहंता ३३
मित्रा चिताहि बरवी नच योग्य चिंता
चिंता महानल तनू दहतो स्वचिता
तेजोनिधी तव शरीरहि नित्य आहे
शास्त्रज्ञ बोलति असें मज दुःख वाटे ३४
कोट्येकवर्षअधिकें तव लक्ष ऐशीं
आयुष्य बोलति पुढें गति होय कैशी
निस्तेज होउन नभीं वसशील तेव्हां
दाता तुझ्यासम जनांस मिळेल केव्हां ३५
येणार फार पुढती जननाशकाळ
दावील मानव भयंकररूप काळ
तो हाच होय गमतें मम या मनाला
नैराश्यपूर्ण सकलां करि जो जिवांला ३६
चिंता त्यजीं वद तुला नच जीवचिंता
त्राता असून सकलां तंव तूंच हन्ता
होतोस काय ? मम होग्य नसेच पृच्छा
चिंता सुटे न, जंव होय न पूर्ण इच्छा ३७
होणार तें नच चुके परि या जगांत
विज्ञप्ति मी तुज करीं धर तूं मनांत

सोडून मुक्त जंव तूं जगभारधूला
होशील अन्य वर दे मग या वधूला ३८

सामान्यकार्यकरही निजकार्यमुक्त
अन्या तदा सकल तो निजभार देत
विश्वासुधारणसुरक्षणकार्यकारी
आहेस तूं ह्मणुनि तत्पथ अंगिकारीं ३९

होती अह्मांवर तुझे उपकार फार
भूलोकसौख्य न चिरंतन जें असार
मोहें तयांत पडलों भ्रमलों भवाला
धिग्धीक् न होय तव कीं स्मृति या जनाला ४०

आहे जगीं मम खरा उपयोग फार
ऐसा मनीं धरुं नको बहु गर्वभार
ब्रह्मांडनायक जसे बहु गोल निर्मी
शक्त्यल्प त्यांतिल असें दृढ जाण तूं मी ४१

यदाज्ञेनें मित्रा ! भ्रमसि सह गोलांस धरुनी
यदिच्छेनें होई जगदुदयरक्षाप्रलयही
चमत्कारा दावी परि नच कळे ठाव अझुनी
तया ईशा मानीं मन सतत लावीं तव गुणीं ४२

नाहीं अंत जया अनादि असुनी आकार नाहीं जया
विश्वाधार असून वास न कळे जो चर्मचक्षूंस या
सर्वा साक्षि असे कृतींत नियता ज्याच्या कधीं ना उणें
लावीं लक्ष सदा तदंघ्रिकमलीं आकाशचूडामणे ! ४३

लक्ष्मण.

## निर्झराचें संगीत.

( एके दिवशीं उदासवृत्तीनें एका जलप्रवाहाच्या कांठीं बसलों असतां पाण्याचा खुळखुळाट व निसर्ग शोभा पाहून माझें मन वेधून गेलें. मी एक सारखा त्या प्रवाहाकडे पहात राहिलों. तसा तो खळखळाट नसून तो प्रवाह कर्ण मधुर गीतच गात असावा असें वाटूं लागलें. मीही लक्षपूर्वक ऐकूं लागलों. )

चाल–( हे मना, सोड कल्पना, पूर्ण कामना. )

बा नरा ! असा घाबरा वनीं आसरा घेउनी बससी
कां अधोमुख गड्या ! हताश तूं दिसतोसी १
कां खिन्न, असा उद्विग्न, विचारीं मग्न, पूर्ण झालासी
कोणतें कार्य तुज देइ सख्या ! अयशासी २
आपदा अभिभवास्पदा अमित तापदा पदोपदिं येती
परि सूज्ञ स्वीकृत कार्य न सोडुनि देती ३
कारिं काम सदा निष्काम अंतरीं स्मरुनि राम कैवारी
तूं श्रमाचा धनी फलावाप्ति मनिं न धरीं ४
मग खास येइ उल्हास होतसे आस मनाची दासी
बहु दूर कशाला मद्गति कां न पहासी ५
मी कसा वाहतों दिशा धरुनि; हा ठसा हृत्पटावरती
उमटविं; जरि मज अवरोध सतत खल करिती ६
हा कुंज वालुकापुंज दंड निःसंग मार्ग मम धरितो
हा अश्म--संवही प्रतिहतगति मज करितो ७
हे काष्ट मृत्तिका लोष्ट स्वमार्ग--भ्रष्ट कराया मजला
मृत्पिंड--समुच्चय ठायिं ठायिं हा जमला ८
परि भया न धरितां, तयां निवारूनियां कष्ट जरि पडती
बघ वळणें घेउनि मार्ग काढितों पुढतीं ९

थांबतों मुळिं न; वाहतों बिकट मार्ग तो होत मज तेव्हां
उन्नतावनत ये भूमिभाग मधिं जेव्हां १०
यापरी झिजलियावरी आस हो पुरी संकटाविल तो
पथ आक्रमुनी जळपूर्ण तटिनिला मिळतों ११
केवढे उंच ते कडे खडक; मधिं अडे वाट; तरि धरितें--
मनिं भीति न; मजसम मार्ग आक्रमण करितें १२
जे थोर तयांसहि घोर संकटें; जोर करुनि भासविती
भय; ते स्वीकृत पथविभ्रष्ट न परि होती १३
तुज धैर्य उमेदहि शौर्य कराया साह्य असति कार्याला
हा केवळ वारिप्रवाह मम साह्याला १४
कोंडुनी तयांला मनीं खिन्न होउनी उगा कां बससी
कां बळें प्रवाहा स्वकर--पिहितमुख करिसी १५
तूं धीर असुनि खंबीर पूर्ण गंभीर भ्याड झालासी
कां अजागलस्तनसमान निर्बल होसी १६
चल ऊठ होउनी धीट करुनियां नीट मनीं सुविचारा
होशील विजयि करिं सकल जगीं संचारा १७

—————— विठ्ठल कृष्ण नेरूरकर.

## कर्म--विपाक.

### श्लोक.

देवानें मज एक पुष्प दिधलें वर्णावया त्याजला
मीं त्याच्यावर गायिल्या कितितरी आनंदसंगीतिका
तत्संगोपनिं अक्षमत्व मजला कालें यदा आणिलें
तेव्हां मीं मम मित्रपाणिं पुटकीं दुःखें तया घातलें १

होतें पुष्प ‘ नको नको ’ ह्मणत तें जेव्हां तया दीधलें
जातांना मजला बघून रडलें दुःखज्वरें बापुडें !
मित्राला किति घातली शपथ कीं, द्यावें न या अंतर !
त्यानेंही सुमहोत्सवैकहृदयें संमानिलें मद्वच. २

होतें कांहिं दिन प्रसून पडुनी मन्मित्रगेहांतरीं
गेला तो मम मित्र हाय ! पुढतीं कालानलीं भाजुनी
तेव्हां त्या सुमनास घेउनि तयें बागेमधें स्थापिलें
सांगोनी मग पावला मजसि तो तादात्म्य कालामधें ! ३

होतें ढाळित अश्रुतें उपवनीं माझें बिचारें सुम
मालाकारकरांत तों अहह ! तें भोळें पडे जाउन !
त्यानें त्यास विकावयास्तव पुढें पण्यस्थलीं मांडिलें
एका कामिजनें तया विकत हो ! त्यापासुनी घेतलें ४

त्यानें तें मग आपुल्या प्रणयिनी वारांगनेला दिलें
आनंदातिशयें तिनें स्वकबरीमध्यें तया खोविलें
नीचस्पर्शवशें तिथें दलित तें झालें बिचारें सुम
स्वप्राणासहि हाय ! त्या समयिं हो ! गेलेंच कंटाळुन ! ५

वेश्येनें दुसऱ्यादिनीं सुमन तें माडींतुनी फेंकिलें
होते खालुन नेत त्याचसमयीं प्रेतास कोणी बरें
त्या प्रेतावरती अचूक पडलें येवोनियां पुष्प तें
दैवाची गति या हताश जगतीं आश्चर्यकारी असे ६

त्या पुष्पास मग स्मशानतलिं त्या प्रेतासवें जाळिलें
होते विप्र परेतसूक्त ह्मणत प्रेतात्मसंमुक्तितें
पुष्पाला परि गायिलीं कितितरी सूक्तें नभीं देविंनीं
श्रीगंगौघतरंगशीतपवनें नेलें तया नंदनीं. ७

मी उद्भ्रांतपणें शिलेवरि वनीं बैसोनि होतों यदा
तेव्हां येउनि सर्व वृत्त कथिलें चाषें रडोनी मला
मीं बाष्पांजलि अर्पिला कितिकदां पुष्पास त्या प्रीतिनें
चाषानेंहि तदा तिलांजलि दिला त्यालागुनी भक्तिनें ८

ऐसे हे इतिहास रूपकमिषें मल्लेखनीनें किती
काव्यीं गुंफुनि ठेविलें कितितरी आहेत, नाहीं मिती !
ते केव्हांतरि जाणतील कविताप्रेमीच त्यांलागुनी
नाहीं नीरसगद्यलोकशत हें जाणावया त्या क्षमी ! ९

पुष्पाची हृदयांतरीं स्मरतसे जेव्हां कहाणी मम
होतीं चित्त फुटून दोन शकलें तैं क्रंदुनीक्रंदुनी !
दुःखानें वदनामधून निघते शद्वावली यापरी
'आहे कर्मविपाक घोरच जगीं, नाहीं तयाला मिती !' १०

नागेश.

---

## विश्व--विद्वेश.

पद.

धडपड गडबड बडबड भेसुर
कोलाहालें भरलें अंबर
गरगरतें बघ जग हें त्यावर
चिरवांछित चित्शांतीचा या लाभ नसे जगीं खरोखरी !
जगीं नसे या शांति--निवास
स्मशानांत तरि असेल खास !
कशास जीवित--यात्रा तर मग ? स्मशान--यात्रा तीहि बरी ?

२

जिकडे तिकडे बंधन ! बंधन ! !

किंवा जग ह्मणजेच बंधन !
पारतंत्र्य हें जगास जीवन–
मृग--जलवत् स्वातंत्र्य खरोखर अंतवंत ह्या जगतांत !
मर्त्य जगावरि रुसूनि गेलें
अनंतांत तें काय दडालें ?
अनंतांत जरि लाभ तयाचा फार बरा तरि देहांत !

३

अगणित खळजन विहरे भूवरि
रसनाग्रीं मधु, जहर अंतरीं.
दांभिकता सर्वत्र पसरली !
निर्व्याज–स्मित जगांत दुर्लभ ! मिळेल मग तें कुठें बरें ?
दंभाविरहित चारु--हासिनी
असतिल केवळ जरि त्या गगनीं--
स्मशान--वन्ही--धूमांतूनहि गमन तेथचें फार बरें !

४

जगीं शांति--नय--धर्म--नीतिचा
सवदा होतो सदा प्रीतिचा
‘ विनिमय ’ हा तर नियम जगाचा
निरपेक्षा शद्बांत ! अंतरीं स्वार्थ सुखेच्छा प्रबलतर !
क्षयी कलंकी मधुकर केवळ
अंबरगत निःस्वार्थि खरोखर !
गाढालिंगन द्याया मग त्या दहनालिंगन तेंहि बरें !

५

आत्म–स्तुति वा पर--जन--निंदा

जन--रसनेला एकच धंदा
मानिन कोणी गुण--ग्रहणता !
मर्मच्छेदन इथें सदोदित ! मर्म--ग्रहणा मुक्ति दिली ! !
गुण--ग्रहण--रत असेल तो जरि
मानस--वासी राजहंस तरि
'सोहं' हंसा ! तुज आलिंगिन देउनि देहा तिलांजलि !

६

दुर्बल जन पद--तळीं तुडवुनी
सबला वंदुनि विनम्र होउनि
सम--दृष्टीला कोणि न मानी !
भ्याड मूढ जग निष्ठुर भारी ! विटलों त्याला मीं पुरता !
अबलसबलसे भेद न मानी !
काळच केवळ हा सम--दृष्टी !
कराल वदना उघडीं काळा ! उडीच घेतों त्यांत अतां !

७

जीवन परजीवापहार हे
अननुभूत सुख पर--दुःखाचें
मुक्ति--धाम पर--पीडन ज्याचें--
नितांत निष्ठुर त्या ह्या जगतीं भूत--दया जन तुच्छ गणी !
भूत--दया--घन त्रिलोकमित्रा !
असती केवळ तूंच भास्करा !
अग्नि--गोलका ! तुज आलिंगित ! त्वदाकार करिं मला झणीं !

८

ह्या जगताचें ह्या जगतांतिल !

नकोच मज तें ह्या जगतावर.
विटलों पुरता ह्या जगतास--
ह्या जगताचा विटाळ कसला तरी, कधीं तरि ज्या झाला !
चिदानंदमय, उपाधिविरहित,
केवळ, निर्मळ, जगा अगोचर--
असें असे तें माझें ! कोठें ? कसें मिळावें परी मला ?

सीताकांत.

## माझें फूल.

### श्लोक.

माझें फूल असो कसेंहि परि तें माझें मला आवडे
आहे तें जरि गंधहीन अगदीं साधें सुधें तें जरी
फेंकोनी सगळीं जगांतिल फुलें देईन त्याच्यापुढें
गेला प्राण निघोन तेंच तरि मी ठेवीन या अंतरीं १

नानासुंदरगंधयुक्तसुमनें दृष्टी पुढें तीं नको
रत्नें कांचन सर्व तुच्छ गणितों; आहेत सारीं फिकीं
नक्षत्रें अवघीं; तसें अमृतही माझ्या न कामास ये
माझें फूल असो कसेंहि परि तें माझें मला आवडे. २

निंदो हे जन कीं ह्मणोत मजला वेडा पिसा वा खुळा
बोलो काय हवें तसें न परवा विश्वीं कशाची मला
जा, नानासुमनांत गुंगत रहा भृंगा ! तुला योग्य तें
माझें एकच तें पुरें सुम मला सर्वस्व माझें मिळें. ३

के. एल्. टेंभुर्णीकर.

# काव्यरत्नावली.



## अंक ८ वा.

### आर्तरव.



श्लोक.

प्रभो, मूढ मी मंद, चांडाळ, पापी,
करीं दंड घेऊनि हा काळ दापी.
ह्मणूनी करी हेलना तूं न माझी
अनाथासि तूं नाथ, हें व्यर्थ कां जी ? १

किती काळ हा यातनाभार साहूं ?
पहा, प्राण जाती नको अंत पाहूं.
तुझी कीर्ति ऐकून दारास आलों
कृपा लाभतां धन्य वाटेल झालों. २

मनीं वाटली भीति माझ्याच आधीं
कशा नष्ट होतील या सर्व आधी.
अजामेळवार्ता जईं ये कळून
कुशंका मनांतील गेली पळून. ३

तयें धर्मकर्तव्य सांडून सारें
त्यजूनी सुधा जेंवि घ्यावें विषा रे !
तशी सेविली वारनारी सदा ती
पुरा अंध हो ! अन्नही दे तया ती ! ४

तिच्या पुत्रपौत्रासही तोच पोशी
स्वयें कष्ट तो मूकसा नित्य सोशी
सरे आयु; कंठीं पडे काळपाश
स्मरे तेधवां पुत्रनारायणास. ५

परी पापिया त्या तशा ब्राह्मणाला--
तुवा उद्धरीलें स्मरे मन्मनाला
तुझें नाम येतां कसेंही मुखास
मना वाटला त्वत्कृपालाभ खास. ६

पुन्हां वाटलें अन्य माझ्याप्रमाणें
तुला याचिती रोष येईल तेणें
परी तूं दयाब्धी तुला राग कैचा ?
सदा तिष्ठसी दीनकार्यार्थ साचा. ७

पुढें आणखी राहिली एक शंका
जरी गाजतो त्वत्कृपेचाहि डंका
तरी माळ लागेल जैं याचकांची
कशी तैं गती होय या बापुड्याची ? ८

परी विश्वसाक्षी तुला ना दिसेल
असें काय लोकत्रयीं या असेल ?
मलाही पहाशील; आक्रोश माझा
तरी ऐकुनी धावणें दीनकाजा. ९

तथापी वदे चित्त माझें मलाच
" प्रभूनें पुसावें कसें रे तुलाच ?
नसे जन्मुनी साधिली एक विद्या
कसा प्राप्त होशील त्या श्रेष्ठ आद्या ? १०

स्वयें कृष्ण बोलें, बहू जन्म घेतां
तशी ज्ञान संशुद्धि संपूर्ण होतां
पुढें पावतो ईशपायांस जीव
करील प्रभू तो तुझी केंवि कींव ११

कुणी एक अष्टांगयोगें समाधी
पुरी साधुनी आत्मतत्वास शोधी
किती वेद अभ्यासुनी राहतात
स्मृती शास्त्र मंत्रे किती शोधितात. १२

तसे तापसी देहदण्डप्रभावें
परेशास संपादिती भक्तिभावें
तुवां यांतला कोणता यत्न केला ?
कसा ईश पावेल रे! मंदधीला " १३

असें वाटतां जाहलों मी निराश
तुझ्या प्राप्तिची ती नसे आस लेश
गमे शून्य सारें! सुचेना मनातें
पुसूं मार्ग यांतील कोणा जनातें ? १४

मना त्यांतही एक बोले विचार
" कशाला हवे शास्त्रवेदादि चार ?
जयें मूढ पाषाणही उद्धरीला
असे ईश तो भक्तिचा रे! भुकेला! १५

पुराणें पहा साक्ष देतात काय ?
कशानें प्रभू दूर सारी अपाय ?
कधीं पाहतो काय तो देव जाती ?
तयाच्या कृपें सर्वही दोष जाती. १६

पहा आधिंचा क्षुद्र कोळीच वाल्या
तयें पापराशी किती घोर केल्या !
किती जीवहत्या करी ! तो स्वहस्तें,
परी भेटले संत शेखी तयातें. १७

तयांच्या कृपें बाणला खेद चित्तीं
गमे शून्य संसार, दृष्टी न वित्तीं
मुखानें जपे एक तें रामनाम
जगीं श्रेष्ठ तो होय आरामधाम. १८

तसें त्या ध्रुवालाहि पंचाब्द सारें
तदा ज्ञानवार्ताहि कोठून त्या रे ?
परी एक भक्तीमुळें वश्य झाला
प्रभूनें दिलें स्थान तें उच्च त्याला. १९.

बहू संत झाले असे या जगांत
जयांची कृती बालवृद्धादि गात
तिथें ईश पाही न विद्या न कूळ
तयाच्या कृपेलागिं भक्तीच मूळ. २०

कशाला हव्या या कथा मानवांच्या ?
स्तवोनी तयां दूषवावी स्ववाचा ?
करी जो कृपा क्षुद्र पश्वादिकींही
चिकित्सा तयाला सुचे सांग कां ही ? २१

पशू जो पुरा, जन्म रानांत ज्याचा
कशाचें तया ज्ञान ! कोठील वाचा ?
गजेंद्रास ज्या जेधवां नक्र ओढी
तदा, यातनांतून त्या कोण काढी ! २२

निघेना जलांतून पाऊल जेव्हां
स्वयें हांक फोडी ' प्रभो ! धांव ! ' तेव्हां
दयाळू हरी धांवला तो समर्थ !
गजा उद्धरीलें प्रभूनें क्षणांत. २३

कशाला ! नरा ! व्यर्थ चित्तांत चिंता
अनन्यासि तो रक्षितो, सत्य वार्ता
मनापासुनी दीन होऊन त्यास
स्तवीतां वळे तो, करी दुःखनाश " २४

प्रतीती अशी वाटतां या मनाला
कशाला विचारूं पुन्हां त्या जनांला !
प्रभो, यापरी पूर्ण निर्धार होतां
कृपेची तुझ्या आस दे शांति चित्ता. २५

असो; सांगतों सर्व माझी कहाणी
तुझे चिंतितों पाय मी दीनवाणी
अनन्यासि रक्षीं, निराशा करीं न
तुझ्या कीर्तिची वाढ लोकीं करीन. २६

प्रभो ! गर्भिंचे कष्ट ते काय बोलूं ?
किती रक्तमांसादि घाणींत लोळूं !
तुला प्रार्थिलें तेधवां म्यां बहूत
परी जन्मतां त्वत्स्मृती नष्ट होत. २७

कसा मातृगर्भांतुनी मुक्त होतां
मुखांतून टाहो निघे, लोकनाथा !
प्रभो ! कौतुकी नाचले लोक तेव्हां !
' अहं ' बंधनीं मी पडे मात्र देवा. २८

तुझी थोरवी काय वर्णू परेशा ?
पुरी विस्मृती हो; पडे मोहफासा
परी निर्मुनी दुग्ध मातृस्तनांत
तुवां सोय केली; दया त्वन्मनांत. २९

मला रक्षिते शैशवीं पूर्ण माता
तिच्या आश्रयें बाल्य सौख्यांत जातां
मला चालतां बोलतां जैं स्वतां ये
तईं खेळतां खेळतां वेळ जाये. ३०

पुढें चिंतिलें मत्पित्यानें, 'मुलाला
करूं शिक्षणारंभ या पाडव्याला'
गुरूच्या गृहीं लागलों नित्य जाया
न ये एकदां नाम तूझें मुखा या. ३१

गुरूनें दिले पाठ ते पाठ केले
'मनीं काळजी घे' गुरू नित्य बोले
तसा वागलों मान्य लोकांत व्हाया
परी नाम तें गोड ये ना मुखा या ३२

पुरी जाहली लोकविद्या प्रयत्नें
मला वाटलें धन्य, 'ये कीर्ति यानें'
पुढें बोलतो तात संसार तूझा
गृहस्थाश्रमीं साध रे! लोककाजा ३३

प्रभो! लग्न झालें, युवा मी नवीन
वधू योग्य लाभे सुखीं होय मग्न
गमे तुच्छ तैं सर्वही माय तात
मदें होय तो पूर्ण कीं हाय! घात. ३४

प्रभो ! होतसे ताप चित्तास आतां
कसा मूर्ख मी देत लोकांस लाथा
मुळीं नायके वृद्ध मातापित्यातें
घरीं मी धनी; काय सत्ता तयातें ? ३५

युवा मी; मला लौकिकी ज्ञान कैचें ?
करीं द्रव्य ये जें मला हो ! फुकाचें
मुले पाहुनी हाय ! कांता सुवर्ण
पडे मर्कटाहातिं कोलीत पूर्ण ३६

न म्यां ऐकिली बुद्धि सच्चिंतकांची
गळे धर्मबुद्धी, मती खाटकाची
त्यजी लाज, वाटे जगीं मीच मोठा
सुखा संप्रती माझिया काय तोटा ? ३७

घडे संगती दुष्ट लोकांत भारी
मना लागले छंद नाना प्रकारीं
बुडे अल्पकाळांत मी फार, देवा
वदें, यातनामुक्त होणार केव्हां ? ३८

मना वासना चांगली ती सुचेना
कुणी बोध केला तरी तो रुचेना
कधीं ये न चित्तीं 'पुढें होय काय ?'
पुरा गुंतलों मोहजालांत; हाय ! ३९

मुळीं पापभीती न वाटे मनाला
गमे 'थोर मी; काय भेणें जनांला ?'
मदांधें अनाचार मीं; फार केला
परी संप्रती त्वत्कृपेचा भुकेला. ४०

जनीं पूर्वजीं थोर जी कीर्ति केली
क्रियानष्ट मी ! कीर्ति ती नाश केली
विचारा न थारा दिला तेधवां मी
उठाठेव ही फार केली रिकामी ४१

परंतू सुखांतील त्या लेश आतां
नसे राहिला हाय रे ! लोकनाथा !
किती क्लेश हे, लागले पूर्ण वाढी
प्रभो ! धांव रे धांव ! यांतून काढी. ४२

नसे राहिलें त्राण देहांत कांहीं
कसे हाल हा ! इंद्रियें दीन पाहीं
असें वाटतें 'एकदां मृत्यु येवो
नको सोसणें दैन्य; हा प्राण जावो.' ४३

मनीं येतसे 'काय जन्मून केलें ?
वृथा भार भूमीस हें काय झालें
जरी हीन तो स्वार्थ मी साधिला न
परार्थासिही हा! मुके; हाय ! पूर्ण. ४४

जरी लागलों मी सुखाच्याच पाठीं
तरी शेवटीं दुःख तें येत गांठीं
कसा हा जलाभास मोही मला हो !
कशाचाहि झाला न जन्मून लाहो. ४५

पुरा बाणला चित्तिं उद्वेग आतां
कधीं आठवीलें तुला मी न ताता !
कुणीं निर्मिलें विश्व हें, कोण पाळी ?
मनीं नाणिलें दुःख हा ! ये कपाळीं. ४६

असें कोण मी ? जन्म कोठून झाला ?
जनीं मृत्यु तो काय ? भीतात ज्याला
पुढें जीव तो जाय कोण्या गतीला ?
अशाचा न संस्कार झाला मतीला. ४७

असे द्वैत लोकांत अद्वैत किंवा ?
जडीं ईशचैतन्य आहे कसें वा ?
असे काय आत्मा नसे वा चिरायू ?
अशा चिंतनीं लेश गेलें न आयु. ४८

कुणी तत्ववेत्ते विचारें करून
महातत्व तें शोधिताती नवीन
परी मंद बुद्धी असे ती मदीया
कसा आळवूं मी तुला देवराया ! ४९

जगीं राहती लोक नानारितींचे
तसे धर्म त्यांनाहि नानाप्रतींचे
तयांतील तत्वें तशीं बंधनेंही
जगीं पाळिती सुज्ञ, त्यां भीति नाहीं. ५०

मलाही असे धर्म कांहीं परीचा
परी प्रत्ययो त्या नसे अंतरींचा
मना मानलें त्यापरी वागलों मी
फुका जाय आयुष्य या काळहोमीं. ५१

मना वाटतें, काळ येईल आतां
दशा कोणती शेवटीं, प्राण जातां !
कसा सार्थकीं देह हा शीघ्र लावूं ?
इथें व्हावया साह्य कोणास बाहूं ? ५२

समर्था, प्रभो ! तूं जगीं सर्वसाक्षी
दयाळूपणाची तुझी कीर्ति ऐशी
परी ठाउकें रूप नाहीं तुझें तें
किती अज्ञ मी ! तुच्छ हा जीव वाटे. ५३

तुला कोणतें नाम घेऊन बाहूं ?
कसा बोलशी मद्विनंतीस बा 'हूं'
तुझ्या नामरूपादिकीं पूर्ण अज्ञा
कसे दाविशी पाय तूं सर्वसुज्ञा ! ५४

अनंता ! तुला आदि ना अंत कांहीं
तुझी सर्व लीला, तुझी सृष्टि पाहीं.
मना योग्य वाटेल त्या नामरूपें
तुला कल्पितां तूं उभा तत्स्वरूपें. ५५

किती मूढ ते उद्धरीले दयाळा !
अपायांतुनी राखिलें गा ! तयांला
मला धांवुनी रक्षि तूं चक्रपाणी
वृथा तूं नको रे ! करूं संतवाणी ५६

कशाही प्रकारें तुला आळवीतां
जनांची दुरी नेशि तूं सर्व चिंता
जरी मी न अद्यापि सत्कृत्य केलें
तरी पाहिजे त्वां मला उद्धरीलें ५७

मनाची किती वृत्ति ही चंचला रे !
बहू दाविते आस ओढी मला रे !
असा मोह पाशांत गुंतून ठेवी
तुझ्या चिंतनीं वृत्ति ही केंवि जावी ? ५८

असो; काय मी मंद हा! बोलणार?
वृथा बोलुनी काय हो चालणार?
प्रभो! ऐक ही शेवटींची विनंती
नको दूर लोटूं प्रभो! दीन अंतीं. ५९

जरी मत्करीं घोर अन्याय झाले
तरी माय तूं! त्यां न पाहीं, दयाळे!
रडें मी! पडें, घे उराशींच आतां
अगे! धांव हां! काय हा प्राण जातां! ६०

नमस्ते, परेशा, अगा! विश्वपाळा!
हरे राम कृष्णा ह्मणीं ये कृपाळा!
उपेक्षूं नको रक्षि बा! दीन दास
पदीं ठेवितो शीर्ष हा श्रीनिवास. ६१

श्रीनिवास.

## तर मग मी देवाची!

आर्या.

संपादुनी नियामक नियुक्त तो गुरु नियोग ये तरणी,
मार्गश्रम वाराया द्रुतगति परतोनि आपुल्या सदनीं. १
बघतां धवा प्रतीची आनंदें बावरे मनीं भारी,
नवल न दयिता गमनोत्सुक असती ज्या पतिव्रता नारी. २
फिरफिरुनि मान उचलुनि किंचित् तिर्यक् करोनिया दृष्टी,
निरखुनि चिर रविवदना पावे ती नववधूसमा तुष्टी ३
वदनीं तेज झळाळे प्रणयाचा रक्तिमा जणूं दाटे,
अरुणध्वज मदनाचा किंवा हा रोंविला मनीं वाटे. ४

निजमंदिरीं रवीला येउनि जों एकही न घडि झाली,
विधिनियत तोंचि जवळी ये पाताळ प्रयाण त्या काळीं. ५
सुखद प्रवास व्हावा होतां मार्गीं न कांहिंही बाधा,
साक्षेपानें भास्कर चढवी पोशाक अंगिं तो साधा. ६
दिव्यद्युतिरत्नांची मंजूषा निजकरेंचि काढोनी,
पावकदीपवनस्पति यांप्रति टाकी सहर्ष देवोनी. ७
दयितानुमोदनाची अल्पहि बघतां न वाट तो जाय,
जगदुपकृतिच्या पुढतीं श्रेष्ठां प्रणयादि कायसा होय ! ८
जातां रवी प्रतीची कोपें हो लाल मावळे शांती,
होतां न मनाजोगें अबलांची कोप हीच विश्रांती. ९
पश्चिम दिगङ्गनाचा झालेला विरस पाहतां नयनीं,
आनंदली कितीतरि मुग्धा प्राचीहि तेधवां स्वमनीं. १०
सापत्न्योद्भव हर्षें पसरे स्मित आसुरी तिचे वदनीं,
तें द्रोहहेतुहर्षण खेळे चमके सुतीक्ष्णशा नयनीं. ११
अनुसरुनी प्राचीतें अन्यहि त्या उत्तरादि दिग्युवती,
हासति खदाखदा किति सज्जचि सुजनोपहासिं ही जगती. १२
आधीं पतिविरहार्ता त्यांत पुनः चिडवितां असें त्यांनीं,
त्रासुनि संतापोनी बैसे ती निज मुखेंदु वळवोनी. १३
होता न तृप्त येणें बाळेला अधिक त्या छळायास,
करुनी तिचीच अनुकृति वळविति सर्व स्वकीय वदनास १४
येणेंपरी तयांनीं फिरविलि जों आननें तदा अपुलीं,
तिमिरीं सृष्टि बुडाली गगनीं सर्वत्र कृष्णता भरली. १५
ये तोंचि हळुच मागुनि इंदु प्राचीमुखा करें स्पर्शी,
दचके वळुनि बघे ती बुडति उभय संगभोद्भवा हर्षीं. १६
प्राची सलज्ज झाली मृदुल कपोलीं गुलाब बहु फुलला,

अधरीं विद्रुम, नयनीं पद्म, तसा रदानिं कुंदही खुलला, १७
न बघावें इतरांहीं ह्मणुनि शशी लांबवूनि कर अपुले,
झांकी जों तल्लोचन नवलाचें अपर कार्य तें घडलें ! १८
एकचि गोंधळ झाला विधुचे जों लागले न कर त्यांस,
हासति तयासि साऱ्या करुनी बहुपरि विनोद परिहास. १९
कौतुक तें नव बघुनी लोटे हांसू समग्र विश्वाला,
वरमुनि विधु मुख झांकुनि नीलांशुकिं धांवुनी वरी गेला. २०
जों जों शशि नभिं वेंधे तों तों त्या घेरिती उडू बाळें,
डोळे लुकलुक करिती, गर गर फिरती पळोनि लडिवाळें. २१
समयीं गृहीं अशा मी आलों जों नियतभार सारोनी,
जमुनी सर्व मुलें मम आलीं पुढती सहर्ष धांवोनी. २२
‘ आले भाऊ आले ’ ऐसा एकचि करोनि कल्लोळ,
घालिति विळखे चरणा तद्धृदिं मावे न हर्षकल्लोळ. २३
हासत हासत तेंव्हां घेईं मी धाकट्यास उचलोनी,
केली तृप्ति मनाची प्रेमें बहुवार त्यास चुंबोनी. २४
झालों प्रमुदित अंतरिं झणिं विलया सर्व शीण तो गेला,
शिशुचुंबन अमृतागद संसृतिसंतापजन्य आगेला. २५
रविकर परि घूकांहीं निपुत्रिकीं वीरपुरुषसंतानें,
सज्जनवित्तें स्तेनीं बघतां फुटतात साच तन्नयनें. २६
तारे नभा, लतेला सुमनें, ओजःप्रसाद काव्याला,
कमलें सरोवराला शोभा बाळें तशींच सदनाला. २७
नसतां तोय तडागीं जैसें तें हीनशोभ बहु दिसतें,
तेंवी अपत्यरत्नांविणही गृह दीनरंकसें गमतें. २८
बसलों गेहप्राङ्गणिं बाळें मी सर्व घेउनी संगें,
विसरुनि गुरुता बालक होउनि मी बालसंगतीं रंगें. २९

ओढी मिशा धरोनी कोणी दोन्ही धरोनियां कान,
" बोले च्याऊं म्याऊं भाऊ! काशीस जाउ " हासून. ३०
गोंडस हात चिमुकला कोंबुनि तोंडांत धाकुलें बाळ,
घाली वरचेवरती न कळे कोठोनि आणुनी डाळ! ३१
त्रासुनि धरितां रदनीं कर मी हासोनि खाजवी रसना,
कर सोडितां परी तें घाली उघडुनि पुनः पुनः वदना. ३२
नासाग्रिं तर्जनी मीं धरुनी डोळे तसे वटारोनी
कटिकें दटावितां त्या अनुकृति करि थेट ऐट आणोनी. ३३
ठेवुनि हात चिमुकलें पाठीवरि वांकुनी ह्मणे कोणी,
' भाऊ! पुसा ' भटो, ' मज ' आणियलें काय कोकणांतोनी ' ३४
ठेउनि वीतेवरती वीत वदे ' एक झाड काशाचें,
भाऊ! पुसा मला हें आंबे तोडूं नका परी त्याचे! ३५
दोघे पाठीवरती चढले मजला करोनिया घोडा,
झ्या झ्या ह्मणती देती कोमल करिं चोपही न कीं थोडा. ३६
रागावुनि बाला तैं एक वदे त्यांस रे! चला सोडा,
व्हा दूर, भाउ माझे! कसला त्यांचा करीतसां घोडा! ३७
वदती तेव्हां ते तिज ' होई तूं तूंच दूर! भाऊंचीं,–
आह्मी सारीं, भाऊ अमुचे, नाहींस तूं मुळीं त्यांची ३८
रडवें गोरें मोरें करुनीं मुख बालिका पुसे मातें,
' भाऊ! तुमची ना मी? सांगा कांहीं तुह्मी तरी यांतें. ' ३९
क्षणभर मौज कराया तदा नकारार्थी मान हलवोनी,
' नससी माझी तूं गे! तुझा न मी ' बोलिलोंचि हासोनी. ४०
पाठिंबा हा माझा मिळतां शेफारुनी मुलें सारीं,
चिडवुनि परोपरींनी आणिति रडकुंडिला तिला भारी. ४१

'काळी काळी दिससी अमुचि न तूं एक बोलले हसत,
चिपटीभर कोंड्याला दुष्काळीं घेतलें तुला विकत.' ४२
माता जवळचि होती हसत उभी परम कौतुकें तेथें,
जाउनि धांवत पाही बाला जों तिज धरावया हातें; ४३
'हूं हूं शिवूं नको मज जननि वदे तों धरोनि पदिं सोगे,
उसन्या आविर्भावें दावित सरली हळू हळू मागें. ४४
मागें माय सरे जशि बालाही तेंवि तिजकडे जाई,
विनवी सर्वेचि तव ना! आहें मी सांग सांग गे! आई! ४५
अंतःस्मित दावुनिया माय वदे ती 'तुझी न मी आई,
वेंघळि खुळीहि असली अमुची मुलगी असेल कशि बाई! ४६
देउनि चिमटीभर मी कोंडा दुष्काळि कातकरणीला
त्या तव आईपासुनि विकत तदा घेतलें गडे! तुजला.' ४७
तों तों यत्न करी बहु मातेला ती बळेंचि धरण्यातें,
परि ती स्वमनोरंजनतत्पर माता शिवूं न दे तीतें. ४८
हिरमुसली बाला ती निश्चळ निःशब्द दीन उभि राहे,
गहिंवरुनि साश्रुनयनीं केंविलवाणी अह्माकडे पाहे. ४९
देति न उत्तर कोणी करिती उलटा विलंब परिहास,
पाहुनि हताश झाली विरघळुनी लागली रडायास. ५०
लोळे गडबड भूवरि उठुनि बसे डौल आणि रुसन्याचा,
फुगवुनि गाल चिमुकले करि चंबू ती सुरेख तोंडाचा. ५१
बुझवण तिची कराया सानें भावंड तें तिचे जवळी,—
जाउनि वात्सल्यानें कोमलकरपाशिं आपुल्या कवळी. ५२
'ताई! उगी लडुं नको बांधू गे धल उन्हांत भाऊंचें,'
वदुनी पुनः पुनः तिज उठवी ओढोनिया तिचे ओचे. ५३

इतर मुलें चिडवायां पुसती तिज ' सांग सांग कोणाची '
असली ताई ! तरि तूं?' वदली ती ' मी ' हळूंच ' देवाची. ' ५४

अनंततनय.

---

## डाकिनी–तांडव.

पद.

निद्रा अज्ञानाची भयकर
सृष्टिसतीला पुरी लागली
उच्छ्वसनानें काळीं झालीं
पंचमहाभूतें त्या कालीं
वस्तुमात्रही नसे चराचर १

घोर निशासमयास अशा या
चोहोंकडुनी स्वैरचि नाचत
कोमलांकुरा चरणीं तुडवित
विकट कुहास्यें हर्ष दर्शवित
येत डाकिनीसंघ भूस या. २

कज्जलचर्चित चंड शरीरें
दुर्गंधींचीं घरेंच केवळ
हृदयसंपुटीं तीव्र हलाहल
धरुनि परस्पर करां, निरर्गल
करिती जें त्या तांडव प्यारें ३

कृष्णनिशीच्या श्यामलोदरीं
जनन घेतलें काय ? कळेना!
भेसुर केली करिती नाना

आरंभीती भीषण गाना
भेदरती शीलाहि भूवरी ४

गानश्रवणाचिया भयानें
समीरही जड पंगू झाला
पडत भूवरी त्वरें पळाला
पर्वताचिया दरींत लपला
भीतित्रस्तांत:करणानें. ५

तरुगण जडवत् उभाचि ठेला.
लाविति मेघकपाटें सुरवर–
पाहुनिया कोलाहल महिवर.
नभीं तारका ज्या मृदुलतर
संघ तयांचा घनांत दडला ६

दु:स्वप्नचि कीं काय महीचें,
प्रलयकाल आतांच पातला,
विधि युगगणनेंतचि वा चुकला,
निद्राडोहीं खोल बुडला
जगज्जनक, कीं तयाहि न सुचे. ७

अखिलस्थिरचर या अपकारी
अशी कवण ही शक्ति उदेली
मला वाटतें तत्कोलाहलिं
जाय पळांतचि महि पाताळीं
दचकतसे ही पहा स्वोदरीं ८

कृष्णोदर विस्तीर्ण नभाचें
अधिकाधिक त्या काळें करिती

भीति न लवमात्रहि तच्चित्तीं
ऊठ ऊठ बा! हे जगत्पती!
"आराम" तरी कसा तुज सुचे!! ९
——————— महादेव भिमाजी कुलकर्णी.

## लेखणी.

### श्लोक.

मृदुल नाम! जगत्सुविलासिनी!
कुतुकधी! सुमनोहर मोहिनी!
प्रमुदितान्त कवी तुज पाहुनी
विगतभानहि हो मनिं लेखनीं १

त्वदभिधा किति गे! मृदु मंजुळ
कविस वाटत सुंदर प्रेमळ
तव सुसंभव गे! जरि काननीं
चिरविलास सदा मधुरे! जनीं २

मुख गडे! तव कृष्ण असे जरी
मधुर गे! रसनाःद्वय अंतरीं
अखिल मोदयुते! अवनीतलीं
विहरुनी करि तुष्ट जनां भली ३

करतलीं मृदुली तुज धारिती
तुजसि चुंबित नित्य सरस्वती
सुजन--संगम देसि नरांप्रती--
सकल लोक तरी तुज वानिती ४

कवित्ररत्नकरीं वसुनी सदा
रमविसी हृदयां कविच्या मुदा

अहह !! प्रेम किती तव अंतरीं
प्रणयभाव जरा मज वीतरी ५
परजनां वितरूनि परीमल
त्यजत चंदन देहहि निर्मल
तरुवरांपरि वृत्ति तुझी असे
झिजवुनी तनुला, मुद देतसे ६
सकल भूतलिची मज दूतिका
गमत गे ! विलसे जणु तारका
मधु कटू वचनद्वय बोलसी
इल सुधा स्वमुखें तशि ओपिसी ७
प्रणयलेख कधीं विरहीजनां
विरहपत्र कधीं प्रणयीजनां
मधुरगान कधीं मधुगायकां--
वितरि; हो सुजनश्रुति-हारिका ८
सकल भूतलिं राज्य तुझें असें
खलहि मेळवि संगतिनें तसें
सकल भूमिवरी समता वसे
सुगुण ते तव गे ! मुद देतसे ९
तव वचें कलहा करिती जन
कधिं कधीं करि आवह--मज्जन
कलह लाविसि नित्यहि तोडिसी
वितरिसी सुख दुःखहि भूमिसी १०
तुजसि थोर करीति सुवन्दन
तुजवरी करि प्रेमहि सज्जन

तव निवास असो चिर मद्गृहीं
विनति गे ! कविची तुज एक ही ११
असिबलाहुनि थोर तुझें बल
विभु असें वदती वच प्रेमल
सुखद हो तव संगम गे ! मला
अतुल दे मज संगति ती बला १२
जगतिं तूं रसना कविची असे
कवि--हृदस्थहि भा खुलवीतसे
कविस वाटत जो मुद अंतरीं
तव मुखें जनतेसहि वीतरी १३
गुपित सर्व जगांतिल गे ! तुला--
असत ठाउक; दे वच प्रेमला
तरि सदा तुज घेउनि अंतरीं
मग कवी विहरेल दिगंतरीं १४

शंकर.

## त्रिविध शुचिता.

श्लोक ( वृत्त प्रमिताक्षरा )

परघातपात कधिं चिंति न जें,
उपकारकर्मकरणींच सजे,
नचि गर्हणा परिसतां खवळे
मन तें समर्थ असतें स्वबळें १
परदूषण प्रकट जी न करी,
अथवा करी तरि सुहेतु धरी

मृदु, सत्य, मंगल, वदे वचना
बुध शंसिति सतत ती रसना २
तनु जी श्रमा परहितीं सहते,
विषयोपभोगिं न कधीं रमते
सुकृतींच, भूषणिं न, जी सजते
स्तवपात्र ती तनु बुधां गमते ३
असतां त्रिरूप असली शुचिता
नर साधु होइल विना भसिता
शुचि जो असेल नर तोच भवीं--
सुख देवदुर्लभ असें मिळवी ४
शुचिता गळोनि जडल्यास मळ
सुख लेशमात्र न मिळेल पळ
शुचितावलंबकरणींच झटा,
नच मागुती खलभयार्त हटा, ५

———— विद्याधर वामन भिडे बी. ए.

"प्रेम--यज्ञ."

स्वार्थत्याग व प्रसंगविशेषीं प्राणत्याग हीं सत्य-प्रेमाचीं "भयंकर दिव्यें" होत.)

पद.

भूषित करिसी वसुंधरा
सख्या पांखरा रसिकवरा
प्रणय--गूढ उकलोनि जनीं
प्रणय--रूप जासी बनुनी
म्हणोत कोणी
जन अज्ञानी

" अविचारें दीपावरती
त्वां अपुली दिधली आहुती." १

ममत्व अन्तारिं ठेवोनी
प्रणयीं वाञ्छिति सौख्य कुणी
विकार--वश जीं अशीं मनें
तींच निंदितिल तुला मुने
प्रीति--हेतुला
सर्वस्वाला
अर्पुनि तूं तन्मय होसी
पूज्य ह्मणुनि गणितों तुजसी २

प्रणयरूपिणी मधुर सुधा
प्राशुनियां विधिनें बहुधा
मूर्ति तुझी गोजिरवाणी
निर्मियलीसे सत्य जनीं
कारण त्याविण
प्रेमाकर्षण
जें अद्‌भुत त्वद्‌हृदीं वसे
संभवेल हें सख्या कसें? ३

प्रेम तुझा जीवन--हेतू
तूं प्रेमाचा बिस–तंतू
अमूर्त प्रेमाची मूर्ती
दिव्य दीपिकेची ज्योती
मोक्ष--काळसा
वाटुनि सहसा

तन्मय तूं सखया ! होसी
वेडें परि मजला करिसी ४

——— के. मा. सोनाळकर.

## समस्या.

समस्यापूर्तीकरितां खालीं दोन कविता दिल्या आहेत. यांतील चौथें चरण गुप्त ठेवलें आहे. तिन्ही चरणांतील वर्णनाशीं जुळेल असें वर्णन चौथ्या चरणांत येऊन समस्यापूर्ती करावी. अशा तऱ्हेची समस्यापूर्ती गेल्या वर्षाच्या जानेवारीच्या अंकांत आलेली आहे.

### श्लोक.

बाहूंनीं दृढ आवळूनि सखिला सप्रेम सौधस्थलीं
नेतांना गळती सुमें कचकलापांतून तीं भूतलीं
सोडूनीं पद--धा[1]रणा कवि--सु[2]ता पाहे रस[3]ज्ञाकडे

*   *   *   *

थोडा वेळ विचारमग्न बसलों ठेवूनि मी लेखणी
कांहीं आठवतांच, ती हरपली मत्काव्यसल्लेखनीं
होती सन्निध मत्प्रिया तिजकडे म्यां पाहिलें सस्मित

*   *   *   *

——— दु. आ. तिवारी.

---

१ गति, चाल (पक्षीं) शब्दरचना. २ बुधसुता, कुलजा (पक्षीं) कविता. ३ पतीकडे (पक्षीं) समस्यापूर्ति करणाऱ्यां रसज्ञाकडे.

## हृदयेश्वरीस.

### श्लोक.

आहे हा बघ इंदु येत उदया फेकीत दिव्य प्रभा
वाहे शीतळ मंद वायु सकलां जीवास संतोषवी
पाहे चोंहिकडे असे पसरलें साम्राज्य हें शांतिचें
ये या शीतल चंद्रिकेंत विहरूं गोष्टी मुदें बोलत. १

सान्निध्यें तुझिया अनंत उठती मोदोर्मि--माला हृदीं
त्या सांगेन तुला किती प्रियसखे! या शांत वेळीं गडे!
सौंदर्यें अपुल्या तुवां दिपविल्या पाही नभीं तारका
लज्जाधोमुख होउनी ह्मणुनिया त्या दूर गेल्या गमे. २

आलिंगून महीस इंदु करितो स्वर्भूमिचा संगम
उत्कंठा किति वाटते तव मुखा पाहावयाची तई
या प्रेमोज्ज्वल हास्यपूर्ण वदना जेव्हां पहातों तदा
जें कांहीं मग वाटतें वद कसें येईल वर्णावया. ३

किंवा ये सखये! खुशाल विहरूं क्षुब्धाब्धितीरावरी
भेटाया जणुं इंदुला वरिवरी लाटांस फेकीतसे
उत्कंठा अविषह्य होय ह्मणुनी कीं क्षुब्ध हा जाहला
शद्बें भीषण आपुल्या दशदिशा कोंदाटुनी टाकितो. ४

या सिंधूस बघून येइल तुला कांहीं तरी कल्पना
जें कांहीं हृदयीं मदीय सखये! प्रेमें तुझ्या होतसे.
शद्बाव्यक्त उदश्रुवर्धित नवोन्निद्रा मनोभावना
आतां त्या करूं ये इथें प्रगट गे! अन्योन्य संवीक्षणीं! ५

वामन जनार्दन कुंटे.

# काव्यरत्नावली.



## अंक ९ वा.

## कमलभक्षक.

प्रवेश:— होमर कवीनें आपल्या 'ओडेसी' नामक काव्यांत एके ठिकाणी युलिसीस राजानें ट्राय युद्धानंतर केलेल्या प्रवासाचें वर्णन केलें आहे. युलिसीस राजा प्रवास करीत असता त्यास वाटेंत कमलभक्षकांचें बेट लागलें. त्या बेटावर कोण लोक राहतात याची चौकशी करण्याकरितां युलिसीसनें गलबतावरील कांहीं लोकांस पाठविलें. बेटावरील मूळ रहिवाश्यांनीं त्या लोकांचें आदरातिथ्य करून त्याना कमलें खावयास दिलीं. त्या कमलांमध्यें असा कांहीं विलक्षण गुण होता कीं ती खाल्ली असतांना खाणाराचे वृत्तींत एकदम वदल पडून त्यास तेथून परतण्याची इच्छाच होत नसे. त्या लोकांनीं तीं कमलें खाल्ल्यावर त्यानांही पुन्हां परत आपल्या राजाकडे यावेसें वाटेना पाठविलेल्या लोकांचें काय झालें हें समजावें म्हणून राजानें आणखी कांहीं इसम पाठविले. परंतु त्यांचीही पहिल्या लोकांप्रमाणेंच स्थिती झाली. याप्रमाणें राजाचे सर्व लोक कमलभक्षकांत मिसळले, व तेथेंच ते तीं अद्भुत कमलें खाऊन राहूं लागले. कोणासही आपले घरदार व बायकामुलें यांकडे परत जाण्याची इच्छा झाली नाहीं. याच कमलभक्षकांनीं गाइलेलें गीत प्रस्तूत काव्यांत वर्णिलें आहे. या गीतांत मनुष्य मात्राखेरीज सर्व विश्वशांतींत नांदत आहे. त्यांच्यात गडबड, धडपड वगैरे कांहीं नाहीं. मनुष्य प्राणी हा अचेतन व सचेतन विश्वाचा मुकुटमणि आहे. पण त्याच्याच मागें सारखी पळापळ कां लागली आहे? मृत्यु हा जीवनाची अखेर ना; मग तें इतकें कष्टमय कां? संकटांशीं सतत तोंड देण्यांत व पुन्हां घरीं जाऊन तेथील आपल्या मुलाबाळांच्या व त्यांबरोबर आपल्याही शांतींत ढवळाढवळ करण्यांत काय फायदा आहे? संसारसमुद्रांतील उद्धत लाटांबरोबर झगडण्यानें शेवटीं काय मिळणार? अमृत हे देवापाशीं, पण ते तर मनुष्यांच्या दुःखाविषयीं सदा उदासीन मग

अशा स्थितींत शांतीस वान ती कोठें आहे ! त्यापेक्षां खरोखर चिरकालिक स्वास्थ मृत्यु किंवा स्वप्नमय गुंगी बरी नाहीं ? असा विषय आहे. असल्या उदासीन विचारांना पोषक अशी आरंभीची बाह्यस्थितीही कवीनें उदासीनच ठेविली आहे.

जीवनसंग्रामास त्रासून व त्यांत कष्टाचे मानानें फलसिद्धि होत नाहीं या गोष्टीनें कंटाळून जे निवृत्तिपर बनले आहेत व ज्यांनीं संसारत्याग केला आहे अशा निरुत्साही भ्याड लोकांवर हें अन्योक्तिपर काव्य कवीनें रचिलें आहे.

साक्या.

दावुनि भूमीकडे अंगुली "धैर्य धरा !" [1]ते वदला,
'नगप्राय ही लाट आपणा नेइल हो ! तीराला' १
अपराह्णीं ते सकल पातले एका भूमीवरती,
कधीं न मिळते तिसऱ्या प्रहरीं जेथें मनुजा विरती [2] २
जिकडें तिकडें उदासीनता तेथें दिसली थोर
भासे, ग्लानि श्रांत हवेतें जणूं येतसे घोर. ३
निद्राकरगत असतां पिडिले दुःस्वप्नानें ज्यास
त्यासम जणुं ती[3] वायूवेगें सोडी दीर्घ श्वास. ४
झाला सायंकाल चंद्रमा उगवे पर्वतशिखरीं
उदयगिरीच्या पूर्ण कलायुत, नाचति त्या जललहरी[4] ५
कड्यांवरूनी धावे कृशतनु बाष्पासम अधोगामी[5]
ओहोळ मार्गीं दिसला, लपला, दिसला पुनरपि नामी. ६

प्रवाहविपुला भूमि ! मंदपद पडती कांहीं[6] खालीं
अवगुंठाया विरल घेतली सृष्टीनें जणुं जाळी. ७

---

१ युलिसीस. २ जेथें सदोदित तिसरा प्रहरचा समय असे. तिसरा प्रहर उदासीनता भासविणारा आहे. ३ हवा. ४ समुद्राच्या लाटा. ५ खालीं येणारा. ६ कांहीं ओहोळ.

तमप्रकाशांतुनी चकाकति येतां सहसा कांहीं
जाती वाहत फेनराशिच्या खालुनिया स्थिरवाही, ८
संयुत होतां एकेठायीं सगळे, बनली सरिता
प्रदेशांतुनी धावत वेगें भेटे अपुल्या नाथा[1]. ९

दूरचि दिसली संतत--बर्फाच्छादित पर्वतशिखरें
तीन, होति जी दिपवित नयनां दिनपतिदीप्तिभरें १०
अंबुतुषारक्लिन्न गिरिवर असितवन्यतरुवृंद,
जटिल खालती गुल्माचा भूचुंबित उगवे कंद. ११

पाहुनि मोहक ती वनशोभा मोहित दिनकर झाला
आरक्तीं पश्चिमीं जावया कष्ट वाटले त्याला. १२
पर्वतविवरांतुनी दरीचा दिसला अंतर्भाग
विशाल, भीषणः भजला न कुणी तिचा काढण्या माग १३

लतातरूंचीं, वनस्पतींचीं वात फुले फुलवीत
असतां नग तत्पराग पडुनी झाला ईषत्पीत १४
पर्वतशृंग तीच, भयंकर याच दऱ्या, तीं क्षेत्रें,
तेच जलाचे प्रवाह, होतीं तींच नभीं नक्षत्रें, १५

तेच ऋतू, दिन तेच सर्वदां, तींच फुलें, तीं कमलें,
भूमि जिथं तो निसर्ग [2]अविकृत, अविकृत सर्वचि दिसलें १६
अर्धनिमीलितलोचन सगळे खिन्नचित्तकमलाशी[3],
विवर्ण होनीं मुखें जयांचीं, जमले नौकेपाशीं. १७

रविच्या लोहिततेजें पांडुर दिसलीं कृष्णमुखें[4] तीं,
जैशीं चित्रें नील रेखितां उज्ज्वल पृष्ठावरती. १८

---

१ म्हणजे समुद्रास. २ न बदलणारा. ३ कमलभक्षक. ४ ते लोक कृष्णवर्णाचे होते.

संगें आले घेउन कमळें, प्रभाव अद्भुत ज्यांचा,
दिधलीं प्रत्येकास तयांतुनि ध्याया स्वाद तयांचा १९
मोहकरूपा, स्वादुरसा, तन्मधुरसुगंधा भुलुनी
जैं नाविक तीं करिते भक्षण झाले स्वीकारूनी. २०
तटाभिघातोद्भूत घोररव समीपस्थ वीचींचा
कर्णीं ये तैं त्यांचा ध्वनिसा अस्फुट परतीरींचा. २१
लागे जेव्हां सहचारांशीं कोणी बोलायास
प्रेतशद्बसा येइ तयांच्या क्षीणपणा शद्बास. २२
जरि होता प्रत्येक अंतरीं जागृत, गाढ निशींतें
दिसला; ऐके नाडिस्फुरणीं हृदय करी जे गीत. २३
उतरुनि नौकेंतून, जाउनी तीरावर ते बसले;
उदयगिरीवर शशी तदा रवि अस्तगिरीवर दिसले. २४
गोड तयांना लागे बघणें जन्मदभू स्वप्नांत,
पत्नींचीं बालांचीं सौख्यें स्वप्नीं अनुभविण्यांत. २५
समुद्रास त्या, वल्ह्यांनाही कंटाळुनिया गेले
फेनगिरीते फिरल्या; तेणें उदासीन मन केलें. २६
वदला जेव्हां एक ' न आह्मी परत गृहातें जाऊं '
कमलाशी एकत्र सर्व ते तदा लागले गाऊं. २७
" असे आमुची भुमि दूरवर, मध्यें हा विस्तीर्ण
वारिराशि पहुडला, कधींही न करूं आतां भ्रमण. " २८

---

१ जवळच्या लाटांचा घोर ध्वनी परतीराच्या ध्वनीसारखा अस्पष्ट ऐकूं येऊं लागला. २ स्वप्नांत. ३ फेंसाचा पर्वत.

कमलभक्षकांनीं एकत्र म्हटलेलें गीत

१

इथें मनोहर, त्याहुनि मृदुतर कर्णपुटांवर पडतें
गाणें, विकसित गुलाबदल जें पडुनि तृणावर करतें. २९
अथवा ईषन्मंद कांतियुत सरसीपृष्ठावरती
चतुरावेष्टित दुर्गीं नैशिकहिमबिंदू जें करती ३०
गीत त्याहुनी अंतःकरणीं पडे मंदतर सत्य
होतें करितां क्लांतपुटें जें क्लांतलोचनीं नृत्य. ३१
गीत येतसे ऐकूं अथवा येथें, जें सुखकारी
निद्रेसी आणिते मोदमय गगनांतुनिया खालीं, ३२
येथें पसरे कितीतरी हें शीतल--मृदु--शेवाल;
पहा ! मधूनी त्याच्या उगवे रम्य--रोहिणीजाल. ३३
अंबुकणावृत फुलवेली जणुं अश्रुमोचनें करती;
फलव्याप्त हीं वृक्षें निद्राभरें अफूचीं झुलती. ३४

२

तेव्हां शोकाक्रांत तरी का व्हावें ऐसें भारी ?
किंवा तीक्ष्णक्लेशशरें क्षत आपण मनुजें सारीं ? ३५
पहा, भोगिती विश्रामातें सर्व चराचर भोंतीं,
कष्टांचीं एकेंच आपण घ्यावीं का जड पोतीं ३६
परमेशानें सर्व जगातें जेव्हां निर्मित केलें,
मुकुटमणी मनुजास तयानें सकलांचा सृजियेलें. ३७
तरी सोडितों संतत आपण ऊष्ण दीर्घ निश्वास,

१ चहूं बाजूंनीं वेष्टिलेल्या. २ सुस्थ झालेल्या पांपण्या डोळ्यामध्यें नृत्य करतांना जें गीत उत्पन्न होतें त्याहून मंद. ३ एक पांढरी वेल.

या दुःखातुनि दुजांत पडतों; कंदुकोपमा खास. ३८
फिरलों बहु परि अद्यापि न हें परिभ्रमण संपलें,
किंवा शांतिप्रदनिद्रेमधि चित्त नसे रंगलें. ३९
ऐकत नाहीं निजांतरात्मा करितों वा जें गाणें,
मोदहेतु जगिं दुजा न कांहीं अविरत श्रांतीवीणें. ४०
कष्टावें कां आपण येथें एकटेंच चिरकाल,
आपण नाकांतील जन्मलों सृष्टीच्या जे बाल? ४१

३

वनान्तरीं या वात वाहुनी तरुला पालवितो
अस्फुट शैवालांतुनि पर्णें लहान मृदु घडवीतो. ४२
तिथेंच वाढुनि हिरवीं होतीं, श्रम न अल्पहि त्यातें;
दिवसा मिळतो प्रकाश, सिंचन [1]निशीं दंवाचें होतें; ४३
परिणत होउनि कालें शीतलबंध भूवरी पडतीं,
गरगर फिरतीं प्रवातचक्रीं, इतस्ततां तीं भ्रमतीं. ४४
पहा, वसन्तीं गोड फलांहीं भरतीं वृक्ष सारीं,
पुढतीं येतो दुर्दिन गळतीं पक्व होउनी भारी. ४५
फूल उगवतें, फुलतें, टिकतें नेमियला जो काल,
अंतीं पडतें गळून, त्यातें कधीं न ठाउक हाल. ४६
पर्णहि नाहीं, फलही नाहीं फूलहि तैसें नाहीं
कष्टाया जन्मलें; तयां का अनुकरणें न नरांहीं? ४७

४

उद्वेजित हें दिसतें आह्मां कृष्णनील आकाश,
कृष्णनील या जलधिवरी जें वितान शोभे [2]खास ४८

---

१ रात्रीं. २ सुंदर.

मृत्यु खरोखर जीवनसीमा, प्रत्यय सदैव हाच;
कष्टाचा का तरी सहावा व्यर्थ जीवनें जाच ? ४९
काल नेतसे प्रवाहसंगें वेगें आह्मां दूर
अल्पहि आता अवधि न, होतिल मूक आमुचे अधर. ५०
इथेंच राहूं सुखें एकटें काय असें अविनाश
सृष्टीमाजीं ? कुणी तोडिला मृत्यूचा हा पाश ? ५१
हरुन घेतलें आह्मांपासुनि स्वत्वस्वातें, केलें
सामिल निज विस्तीर्णनिधीमधिं भीषणगत काळें. ५२
झगडुन जीवापाड संकटीं काय लाधतें सौख्य ?
उमगुनिया मृगजलास जाणें ध्याया तें हो मौर्ख्य ! ५३
दिसेल तेथें लेश सुखाचा काय ? जरी बहु झटलों
उल्लंघाया उद्गत वीचिश्रेणी, श्रमीं न हटलों ५४
सर्व भोगिती शांति चराचर वस्तू उदया येती
शांतपणें, त्या परिणत होउनि शांती विलया जाती. ५५
बरवा भीषण मृत्यू, अथवा बरवा चिर विश्राम;
या दोंवाचुनि दुजा न जगतीं सत्य आमुचा काम. ५६

५

किती गोड हें बघणें श्रवणें अपगामी ओढ्यातें
अर्धनिमीलितनयनीं, अमतां स्वप्नीं रत आह्मांतें; ५७
सुस्थ राहणें* इथें, जेंवि तीं रविचीं सुवर्णकिरणें
[1]गोरसवेलीसंगें क्रीडा करिती स्वच्छंदानें ५८
बोल ऐकणें* परस्परांचें गुणगुण[2]रूपें निघती;

---

१ सुवासिक वेल. २ जे बोल अस्पष्ट सुरांत निघतात. * याचा संबंध 'किती गोड' याकडे आहे.

करून भक्षण अथवा अद्भुत कमलांचें दिनरातीं; ५९
निरूपणें जइं कुटिल जलोर्मी आदळती तीरातें,
तशाच वक्रीभूत हिमाच्या श्वेतवर्ण रेखातें; ६०
अंकित करणें सर्वथैव निज हृदयें, वृत्ति मनाच्या
हातामध्यें[1] विषण्णतासंमिश्रित विमर्षतेच्या; ६१
गाणें गीतें; चिंतन करणें; स्मृतितें जागृत करणें
प्रियमित्रांच्या, घालविली यत्संगति निज बालपणें, ६२
सांप्रत असती निद्रापर[2] जे तृणमय भूच्या उदरीं,
असे मूढभर पित्तलपात्रीं वा पांडुर येद्घूली. ६३

६

प्रियकर वाटे आम्हाला तो स्मरतां विवाहकाल,
प्रणयें केल्या रमणींसंगें क्रीडा ज्या बहुसाल, ६४
तसेंच तें, जें दिलें प्रियांनी आलिंगन शेवटलें !
तसेंच त्यांनीं प्रयाणकालीं प्रेमाश्रू ढाळीले. ६५
परंतु आतां समूळ गेलें हें सारें पालटुनी
उदासीनता असेल भरली आतां अमुच्या सदनीं ६६
मुलें आमुचीं सान होतीं जीं पूर्वीं, असतिल झालीं—
पूर्ण आमुच्या संपत्तीचे मालक सांप्रत कालीं. ६७
झाल्या विरूप मुद्रा, अद्भुत दिसूं स्वकीयारामीं;
जातां तेथें पिशाचसे मुद्ध्वंसक होऊं आम्ही. ६८
अथवा निर्भय होउनि जुलमी समीपस्थ सामन्तें
असेल देशा प्रध्वंसियले अविरतपादाक्रांतें. ६९

---

१ औदासिन्य पूर्ण विचारांच्या हातामध्ये. २ जे प्रियमित्र सध्यां पुरले गेले आहेत किंवा ज्यांची रक्षा पितळेच्या भाड्यांत घालून पुरून ठेविली आहे. ३ याचा संबंध ' किती गोड ' याकडे आहे.

उभा राहुनी समोर त्यांच्या असेल शाहीराचा
गात पोंवडा गण दशवर्षावधि ट्राययुद्धाचा. ७०
स्मरणांतूनहि त्यांच्या कृत्यें आतां असतिल गेलीं,
अपूर्व वीरोचित जीं आह्मी समरांगणांत केलीं. ७१
असेल संभ्रम अतुल मातला तेथें द्वीपामाजी,
माजो खुशाल, जाया तेथें मुळिं न आमुची राजी ७२
देव कोपतां असेल झाला कोलाहल जर सत्य,
तरी तया संतोषविण्याचें भासें दुष्कर कृत्य. ७३
पुनरपि तेथें स्वास्थ्य नांदणें दिसतें शक्य न आतां,
असे खरोखर मृत्युहून ती कष्टतरा व्याकुलता. ७४
क्लेश क्लेशांमागुति, दुःखें दुःखांमागुन दिसती;
दीर्घायासहि पडतिल वार्धक्याहत आह्मांवरती. ७५
कृत्यें असलीं करणें दुर्घट रणजर्जरहृदयांना
नौपथदर्शक तारविलोकन दृष्टिमंद नयनांना[3] ७६

७

परंतु अक्षयसुम--शय्येवर सौख्यें लोळत असतां
निद्राप्रेरक--मंद-- वायु जइं होई सुख वाढवता, ७७
सुवर्णभूषित--शैलावरुनी वाहत वाहत येई
स्वच्छंदानें महानदी जी उडी भूवरी घेई. ७८
किती गोड तें लागे संतत बघणें तिजलागूनी
नील नभस्तलिं आह्मां निश्चल अर्धनिमीलितनयनीं. ७९

---

१ घोटाळा. २ कष्टकर होय. ३ ज्याच्या योगानें नावाडी आपल्या नावा योग्य दिशेनें हाकतात अशा ताऱ्याकडे वरचेवर बघितल्यानें ज्यांची दृष्टी मंदावली आहे.

दऱ्यावरूनी वृक्षांवरनी हिमबिंदू पडतांना
होई जो पडसाद[1], तयातें श्रवणें तोषद कानां ८०
हरितवर्ण जो पर्णें पडुनी झाला जलप्रपात
गोड त्यासही बघणें येतां झाडींतूनि वहात. ८१
किती गोड तें दूर विस्फुरत्तारा केवळ बघणें
देवदारुच्या तळीं बैसुनी वीचिघोषणा श्रवणें ! ८२

८

कमळें फुलती तेथ पायथ्यावरती उंचगिरीच्या;
कमळें डुलती मृदु स्पर्शेनें प्रेमभरें पवनाच्या; ८३
वायु वाहतां सदैव झुळझुळु मंजुळ करितो गान;
सभोंवतीच्या सगळ्या निर्जन पर्वतविवरांतून ८४
शिरून जिकडे तिकडे पसरे दाट सुगंधित पीत
पराग, जो उडविला प्रवातें गगनीं, कमलोद्भूत. ८५
खवळे अंबुधि जेव्हां, जणुं कीं तयास येई ऊत,
दोला हो तैं नौका, पडलों कलवंडुनिया त्यांत. ८६
यदि भयंकर जला उडवितां तुफान माजे, आम्हीं
निभावलों, परि झाले तितुके श्रम या पुरेत कामीं. ८७
घेऊं आतां शपथ, निश्चयें सगळे आपण पाळूं,
कमलभूमिवरि विचिंत तेथें राहूं, सुखांत लोळूं ! ८८
अमृत होय अमरांकित केवळ, अशक्य मर्त्यांना[2] तें,
छळती शिवाय अमर तयांना कठोर वज्रापातें ८९
विलसे उज्ज्वलतारामौक्तिकजालीं[3] ज्याच्या भंवती
ऐशा कांचनगेहांतुनि तें[4] बघुनी स्मित आदरती. ९०

---

१ प्रतिध्वनी. २ चर, प्राणी. ३ प्रकाशित तारे हेच मोती त्यांचीं जाळीं. ४ देव.

निर्जन भूमी, नाश, अवर्षण, रोग, तसा भूकंप, ९१
तप्त वालुका, तुफान, वादळ, भौतिक दारुण संप,
प्रलय वन्हिचा, जलाचियाही, धुमाकूळ युद्धाचा, ९२
प्रणाम[1] हस्तीं सविनय तैशी केविलवाणी वाचा.
प्रसंग असले पाहुनि त्यांच्यो फुटे न पाझर हृदयां, ९३
मोद वाटुनी स्मित करिती ते; वृत्ति केवढी सदया ! !
आर्तस्वर दुःखाचे वरती जातां बनतें गीतें, ९४
गोड लागते सुरांस[2] धामीं असतां सुख भोगीत;
मोबदला प्रतिवर्षीं अल्पचि मिळे सोसुनीं जाचा ९५
शेतामाजी जयास, ऐशा गरीब शेतकऱ्याचा
भेदकशब्दीं शोकरसाचा वाहुं लागतां पूर ९६
सुरांस वाटे साच निरर्थक वेड्याची पिरपीर.[3]
कष्ट साहती, अंतीं भोगिति नंदनवनीं प्रमोद ९७
कांहीं; पडती कांहीं नरकीं: ऐसा जनप्रवाद.
नीज खरोखर सुखतर वाटे श्रमाहूनि, जलधीचा ९८
तीरहि बावा नको ताप हा वाताचा, लहरीचा
नलगे आतां प्रवास, विश्रमसुख घ्या नाविकबंधो ! ९९
सुखास वितरूं संतत ह्मणुनी प्रणाम तुज भो सिंधो !

'कमलभक्षक' ग्रथिलें काव्यीं आङ्ग्लराजकविरत्नें[4] १००
दिधलें नारायणें तयाला रूप मराठी यत्नें.

———— नारायण महादेव भिडे, बी. ए.

---

१ नमस्कार. २ देव. ३ अती लांबून आक्रोश करितांना ऐकिले तर त्यांतील बेसूरपणा नाहींसा होऊन गाण्याप्रमाणें ऐकूं येतो. ४ राजकवि टेनिसन्.

## उखाणें.

( चालः-- चंद्रकांतराजाची )

### पद.

तुझीं उखाणीं बहुत जिंकिलीं जिंक सखे माझें
प्रथम कथा ? प्रियकर घरीं कीं बाहेरी आहे १
इथेंच होतें कोणीं नेलें मला न कां पुसिलें
प्रिया ! काय ' मुखवस्त्र आपुलें ? छे ! नाहीं सखये ! २
चंचल परि जें स्थीर जहालें आनंदी दिसलें
' मृग--बालक ' हें आहे येथें. नाहीं ग विमले ! ३
प्रथम निरीक्षण करितां मातें मद्रूपचि दिसलें
कनकपात्र जलपूर्ण इथें हें आहे भरलेलें ४
तुझ्याच योगें रुचिर भासलें तुलाच दिसत निकें
बळें स्तवितसां, असेल मन्मुख--भूषण, तेंहि न गे ! ५
आलों तेंव्हां होतें परि तें आतांची गेलें
कां दादाचें पत्रचि होतें ? नाहीं ग चपले ! ६
तुलाच ठावें असें परी त्वां पाहिलें न त्यातें
होतें मन्नव भूषण कां ? तें ? मुळिंहि न तें कांतें ! ७
तुझेंच ज्यातें वेड लागुनी वेडावुनि जाई
नसे योग्य मी, असें काय ? तें असेल तरि बाई ८
तुवांच हरिलें प्रिये ! जयाला तुझेंच तें होतें
पुरें गौरव प्रेम आपुलें या दामीवरचें ? ९
तुलाच होतें पुरें ठाउकें तुवांच तें नेलें
उगाच घेतां आळ मजवरी खरेंच गे ! सगळें १०
जयास येई बहुत रुचिरता रंगहि तो बरवा ,

आतां कळलें. असेल माझा शालू तो हिरवा ११
सजीव ह्मणुं; तरि दिसे न मातें निर्जिव परि नाहीं
असेल कां ? मद्धास्यावरची कोटी अपुली ही १२
सखे ! सखे ! तें तेजोमयही सजल असे पाहीं
काय !! तरी मन्नामाचें हें वेड तुझा बाई !! १३
विश्व साठवीं पुन्हा आठवी तयांत तें भरलें
कसें उमगणें गूढाहुनि हें प्रिया ! गूढ झालें १४
विश्वाची ही एकतानता तयांत भरलेली
कविता देवी असेल आतां अपुली उमलेली १५
विश्वपर्यटण पळांत करुनी जिथें तिथें राहे
काव्य--कल्पना असेल बहुधा मैत्रिण दुसरी हे १६
काव्य--कल्पना-सृष्टीमध्यें दंगचि जें होतें
असेल मग कां ? प्रिया ! आपुलें शुद्ध चित्त हो ! तें १७
प्रेमतरू हालवी प्रियेचा गुप्तचि परि राहे
तुमचें असलें चित्त खरोखर ओळखिलें म्यां हें १८
तुझ्यावांचुनी प्रेमरूप ज्या अन्य नसे कांहीं
शुद्धांतर मी प्रथम कसें तें ओळखिलें नाहीं १९
विजयी झाल्यें बक्षिस देणें अमोल मज नाथा !
कंठीं मिठी घालुनी पहुडली मांडीवरि कांता. २०
कमलमुखीचें चुंबन घेउनि तोषविलें तिजला
प्रेमभरानें पाहत होती टक लावुनि मजला २१
पाहत असतां आतां सखिच्या नेत्रीं जें दिसलें
तेंच असें कीं उत्तर माझ्या कोड्याचें सगळें २२

—— दुर्गाप्रसाद आसाराम तिवारी.

## श्रीघृष्णेश्वर.

( निरोष्ट स्तोत्र--शिखरिणी वृत्त. )

सदा रागासक्त त्रिजग जठरीं चिंतिल कसा ?
जगन्नाथा, जाळी सतत सकलाशा अनलसा
सदा ध्याती गाती हरहर धनेशादिक असें
न देशी घृष्णेशा! सदयहृदया दर्शन कसें ? १

कलाधीशा ईशा निजजन सख्या देह धरिसी
जगत्राया धात्या हरिहर गणेशादि नटसी
सहस्राक्षा दीजे त्रिदशगण त्या रक्षित असें
न देशी घृष्णेशा! सदयहृदया दर्शन कसें ? २

चितारक्षा अंगीं गरलधरकंठा त्रिनयना
जटाधारी साक्षाज्जनक जननी साधक जना
करी ढक्का नागाजिन कटिं तटीं खड्ग धरसे
न देशी घृष्णेशा! सदयहृदया दर्शन कसें ? ३

निशीनाथ ज्येष्ठा तरलतर गंगाजल शिरीं
जगन्नाथा श्रेष्ठ स्थित सगण कैलासशिखरीं
नगेंद्राची कन्या नलिन--नयना रंजित असें
न देशी घृष्णेशा! सदयहृदया दर्शन कसें ? ४

अचिंत्या ही लीला गळनरशिरश्रेणि सरला
कदा नंदीयानस्थित न कळते शंकरकला
ललाटाक्षा कंठीं धरणिधरहारधृत असें
न देशी घृष्णेशा! सदयहृदया दर्शन कसें ? ५

गणेशस्कंदादी-निजतनय--सल्लालनकरा
अनगादी षट्कक्षयकर करीं सायक--धरा

सहस्राक्षासीही चकितकर जें चित्त हरसे
न देशी घृष्णेशा ! सदयहृदया दर्शन कसें ६
अहंता ही कृत्या निजहृदय कांतार जठरीं
सदा खाते चित्ता दहन--कर हें संकट हरी
जगज्जालीं जें कां अनघजनरक्षाकर असें
न देशी घृष्णेशा ! सदयहृदया दर्शन कसें ७
अनंगारी ध्यानीं सकल करणें लागति यदा
तदा चित्‌चित्‌ग्रंथीं रहित असती साधक सदा
सदा जेणें शांती दृढतर निजाज्ञान निरसे
न देशी घृष्णेशा ! सदयहृदया दर्शन कसें ! ८
हरध्यानासक्ता अढळ जडधी जाहलि जरी
जया जाती साऱ्या त्रिजगजलधीक्लेशलहरी
सदाऽनंदी दीक्षा सदय नयनें लक्षित असे
न देशी घृष्णेशा ! सदयहृदया दर्शन कसें ? ९
शरण्या कालारी नतचरणदासा दशकरा
निजानंदा देशी जननलयनाशा नयकरा
दशास्यादी चित्तीं निशिदिनिं जया लक्षिति असे
न देशी घृष्णेशा ! सदयहृदया दर्शन कसें १०
निराकारा नित्या गति न कळते किंचित जना
अतर्क्याच्या तर्का करित थकल्या शेषरसना
अनाद्यंत श्रेष्ठ स्थितिलय जगत्कारण असे
न देशी घृष्णेशा ! सदयहृदया दर्शन कसें ? ११

नागेंद्रहारधृत देहचि शंकराचा
त्राता अनन्य शरणागत किंकराचा
ध्याती तया जन सदा जरि तेचि धन्य
नारायणाग्रज विचिंतिल कां तदन्य. १२

—— विनायक बोवा टोपरे.

## मनाला.

पद.

भज प्रभुला रे ! जग दों दिवसांचें वारें ॥ ध्रु० ॥

बाळपणामधिं खेळ स्मरतो;
गुंगुनि यौवनिं भजतो स्मर तो;
वृद्धपणीं चिंतारत बनतो;
मनुज वृथा रे ! जग दों दिवसांचें वारें १

बांधिन अजि मी उंच हवेली;
लावुनि भोंवति सुंदर वेली,--
करिन सुखानें अंतरिं केली.
श्रमचि सगळा रे ! जग दों दिवसांचें वारें २

पर्णुनि कांता सुंदर खाशी,--
वागुनि आनंदें सकलांशीं,--
मिळविन मी गुरुची शुभ आशी;
मोह सगळा रे ! जग दों दिवसांचें वारें ३

" नानू " माझा करिन हुशार,
वेदांतांतिल शिकवुनि सार;

आणिल धन गृहिं नित्य अपार.
भ्रमचि सगळा रे! जग दों दिवसांचें वारें ४

दारा--सुत--धन हे कवणाचे ?
आप्त--मित्र--जन हे कवणाचे ?
देहाचें स्वामित्व कुणाचें ?
व्यर्थ पसारे! जग दों दिवसांचें वारें ५

कमलदलावरि चंचल पाणी;--
त्यापरि तापद भव मनिं आणीं
फिरुनि फिरुनि ती काय कहाणी ?
सांगुं मना! रे! जग दों दिवसांचें वारें ६

जो तो अपुल्या ठायीं मग्न!
परब्रह्मपदिं कोणि न लग्न;
ध्यातां, येतें अवचित विघ्न!
पाहिं विचारें जग दों दिवसांचें वारें ७

आतां तरि ये ताळ्यावरती;
पुरली कां तव हौस न पुरती ?
अनुताप तुला होइल अंतीं!
समज मना! रे! जग दों दिवसांचें वारें ८

मोडुनि कामादिक रिपु--दंगा,--
सोडुनि संसारांतिल रंगा,--
पदोपदीं स्मर त्या भवभंगा.
भुलशि विकारें ? जग दों दिवसांचें वारें ९

तो जगजेठी जाणे सारें
दावुनि लीला मनुजाकारें,--

ध्रुवपद सुख दे भजनाधारें.
विसरशि कां ? रे ! जग दों दिवसांचें वारें १०
प्रेमें धरिं रे ! सज्जन--संग;
योगाभ्यासीं होई दंग;
भोगीं चिरसुख दिव्य अभंग.
प्रभुला भज रे ! जग दों दिवसांचें वारें ११

वसंत–विहार.

---

## ताराबाई.

( राजारामाची स्त्री–मोंगलाच्या कैदेंतून सुटून शाहू परत येतो असें समजल्यानंतर. )

श्लोक.

शाहू गृहीं परत ये ह्मणती सुटूनी;
त्यातें करी यवन मुक्त कसा निदानीं
बंदींत दीड तप तो बरवाचि होता;
मेला सुटे मज दिसे जणुं तापदाता, १
देई स्वराज्य मज मागुति तो ह्मणेल;
तो श्रेष्ठहक्क अपुला मजला कथील;
पूर्वीं यथेच्छ उपभोगुनि, मी कसें तें--
देऊं अतां परत ? मन्मनिं दुःख होतें. २
आला तयापरिस बंदित कां न मेला ?
येऊन जो मम धनावरि घालि घाला !
म्लेच्छें न वा असु तदीय हरून नेला--
व्याघ्रादिकां अशनसाच करावयाला ? ३
मेला बरा कुजत तेथ सुखेंच होता;
नेईल हा हरुनियां अधिकार आतां !

कोणी पुसे न मज मी अधिकारहीन!
ऐशी स्थिती मम घडेल अतां कशी न? ४

याला उपाय मजला न कुणींहि बोले;
शाहूपदीं दिसाति सर्वहि हे भुकेले;
कैसा कळे न रुचतो खळ हा जनास?
त्याचा कसा न करिशी हरि! सत्य नाश? ५

कामास काय परि येइल हा विलाप?
जों जों करीन तंव देइल थोर ताप!
या पाहिजे खचित योग्य उपाय केला--
जेणें मिळे न निजराज्य मुळीं तयाला. ६

ऐसा सुचे मजसि एक विचार--पाहूं--
झाला जरी सफल मारिन राज्यराहू
सांगूं जनीं सकल हा न मुळींच शाहू;
हा तोतया; वध करा; शमवा स्वबाहू. ७

मारेकरी वश करून, तयांकडून--
निःसंशयें खलविनाश करीन तूर्ण;
आला न जोंवरि इथें नगरासमीप;
भोगील मत्तनय होउन राज्य भूप. ८

सर्वांजणांस करितें वश या वचांनीं;
हा तोतया वध करा अपुल्या करांनीं;
सेनापती, प्रतिनिधी, चिटणीस तेंवी--
मानील मद्वचन तो न अमात्य केंवी? ९

ह्याचा विचार करितात मनांत जे ते--
धाडीन तोंच ममसेवक कार्यकर्ते;

शाहूस जे रविसुतालयिं धाडितील;
येणेंपरी विषम हें सहजीं टळेल. १०

तारा अशा करुनि नीच कुकल्पनेतें,—
दुष्टा धरी निजमनीं वधभावनेतें;
लावी विशुद्ध शिवकीर्तिस डाग सून !
टाकी स्वनाथयशही कुलटा धुवून !! ११

——————— कै० त्र्यंबक जयराम प्रधान.

## आनंदी निर्झर.

(पद.)

दाटी झुडुपांची जेथें
वसती माझी हो ! तेथें
दरींतुनि येतां मी खालीं
चमके तनु, जणुं कीं बिजली
धावत जातों
वळसे घेतों
हळूंच लपतों
नंदनवनिं वा भूवरही
आनंदी मजऐसा नाहीं. १

जो जो मार्गामधिं येतो
सलगी त्याच्याशीं करितों—
धोंडा किंवा वाळूही
भेदभाव मजला नाहीं
मागें पुढतीं
शेतें दिसतीं

चित्त रमविती
नंदनवनिं वा भूवरही
आनंदी मजऐसा नाहीं २
धावत जातां बडबडतों
लोळण घेउनि गडगडतों
सृष्टिसतीचा मी बाळ
अवघे माझे हे खेळ
सरिता बाला
जातों तिजला
भेटायाला
नंदनवनिं वा भूवरही
आनंदी मजऐसा नाहीं. ३
सूर्य--स्पर्शें मी खुलतों
चंद्र--स्पर्शें मी डुलतों
बंधू ऐसे मज असतां
दुःखाची मग काय कथा ?
कधीं घसरतों
कधीं पसरतों
कधीं थांबतों
नंदनवनिं वा भूवरही
आनंदी मजऐसा नाहीं. ४
वसंत येतां मम सदनीं
नटवी मजला सुमनांनीं
सायंकाळीं तारे येती
मौक्तिकमाला बहु देती

नटलों पाहुन
वायू येउन
घेई चुंबन
नंदनवनिं वा भूवरही
आनंदी मजऐसा नाहीं. ५

डोंगर दुःखांचे जगतीं
ह्मणोत कवि ते अल्पमती
सौख्य पसरलें चोंहिकडे
कां रडती जन मज कोडें
चिंता सरली
आशा नुरली
शांति लाभली
नंदनवनिं वा भूवरही
आनंदी मजऐसा नाहीं. ६

मत्सर--मोहांची कोंडी
फोडुनि व्हा रे! आनंदी
पाहुनि या जा कोठेंही
स्वछंदी मजऐसा नाहीं
लोभ कशाचा ?
मान फुकाचा,
मोदें नाचा
नंदनवनिं वा भूवरही
आनंदी मजऐसा नाहीं. ७

——— ———लक्ष्मण जगन्नाथ आकूत बी. ए.

# नदी.

( श्लोक--उपजाति. )

कोठूनि हें निर्मल तोय येतें ?
स्वैरा कुठें तूं फिरशी ? कथी तें
गडे ! अशी वाहसि मंद कां गे ?
नदी मला वृत्त समग्र सांगें १

" दिसे गिरी हा मम तात होई
पर्जन्यवृष्टी ठरतेंच आई
असे मला निर्झर पाळणा हा
तो खेळणा वन्य सुमें अहाहा ! २

जातें दुरी सोडुनि जन्मभूमी
येती सवें ओहळ मार्ग--गामी
परस्परा खेळुनि रंजवीतो
कड्यांतुनी उंच उड्याहि घेतों ३

जातें पुढें रम्य वनांत भागीं
दोहोंथडी पुष्पतरूंविभागीं
पुष्पांजली ते मज अर्पितातीं
वियोग साहूनि निरोप देती ४

परंतु गेले दिन ते लयातें
न कोणिही या समयास त्राते
पहा मला अंतक सिंधु खेची
तयांत लोपेन पुन्हा नयेची ५

विनायक विष्णु पारखे.

## यूनाची युवती छाया.

Women Men's Shadows.
—Ben Johnson.

श्लोक. ( अनुष्टुप वृत्त. )

छायेच्या मागुती तुह्मी लागा; जाई पुढें पुढें--
ती तुह्मापासुनी वेगें; हातीं येईल ना कधीं. १
करा प्रयत्न जायाचा तुह्मीही तिजपासुनी;--
होई त्वदनुचारी ती मागें चपल धावुनी. २
मानिनीतें करा यत्न तोषवाया; तुह्मांकडे--
करील भ्रुकुटीभंग होवोनी रुष्ट मानसीं. ३
मिथ्या कोपिष्ट होवोनी, जा तुह्मी दूर कीं जरा;--
तरी ती अंकिता होई; देईल प्रेम संपदा. ४
समान स्थिति दोघींची दिसे; सांगा खरोखरी--
" यूनाची युवती छाया " मृषा ही काय वैखरी? ५

—नारायण महादेव भीडे बी. ए.

## सुभाषित.

श्लोक.

आला श्रीपति दर्शनार्थ ह्मणुनी केलें फणींद्रा गुण,
नेसूनी गजचर्म ये पशुपती भेटावया लागुन;
पाहूनी गरुडा अहीवर भयें, कौपीन ही त्यासह,
भूपृष्ठीं गळुनी दिगंबर असा कल्याण देवो शिव. १

—सिताराम विष्णु सरवटे.

# काव्यरत्नावली.



अंक १० वा.

## राक्षसकाव्य.*

### श्लोक.

कोणी एक युवा पयोदसमयीं मोदें फिरे काननीं,
संगें घेउनि कामिनी शशिमुखी आनंद पावे मनीं;
तों देखोनि नभोंगणीं विचरतां अम्भोधरातें क्षणीं,
तीतें बोलतसे सुरम्य सुषमा पाहें सखे ! लोचनीं. १

रांगा या गिरीच्या तटीं विलसती कादंब वृक्षांचिया,
वायू वाहुनिया पहा अति जवें आंदोळवीतो तयां;
झाले पीडित हे मयूर अवघे पुष्पायुधाच्या शरें,
पाहें सेविति नीलकंजनयने ! पुष्पें सुखें निर्भरें. २

आलोकीं नगतुल्य तोय विपिनीं जीवेश्वरी ! सत्वरीं,
आकाशांतुनि वारिवृष्टि करितो देवेंद्र भूमीवरी;
जेवीं शोभति मेघ नीलगगनीं शुभ्रा बलाकाभरें.
तेवीं चित्रविचित्र भासति सखे ! हीं पद्मयुक्तें सरें. ३

नेई सूर्य नभीं स्वकीय किरणीं तोयाप्रती शोषुनी,
तेथें तें घनरूप धारण करी शुद्ध स्वयें होउनी;
आकाशांतुनि कोसळूनि पडतां अम्भोद पृथ्वीवरी,
खालीं वाढति हीं तृणें प्रियतमे ! वन्यौषधी सत्वरीं. ४

---

* श्री कालिदास कवीनें राक्षस नांवाचें एक लहानसें काव्य संस्कृतांत रचिलेलें आहे. त्या काव्याचें हें भाषांतर आहे.

जीचें आनन शोभतें विमलशा शीतांशु चंद्रापरी,
नेत्रें सारसतुल्य जी विनटली पीनस्तनांच्या भरीं;
ऐशी ती गजगामिनी प्रणयिनी रंभोरु हंसस्वनी,
देखोनी घन अंबरीं पतिसवें आनंदली मानिनी. ५

देती दुग्ध यथेच्छ खाउनि तृणां ज्या काननाभ्यंतरीं,
गाईंनीं परिवेष्टिला वृषभ हा पाहें वरी अंबरीं;
आकाशीं घनगर्जितां परिसुनी आनंद झाला मनीं,
मोठ्यानें प्रतिगर्जना वृष करी उन्मत्त तैं होउनी. ६

पाहोनी नयनीं पयोद गगनीं भीती धरी अंतरीं,
पृथ्वीपृष्ठनिवासि गे ! वृषभ हा घोरारवातें करी;
शिंगांनीं अपुल्या प्रयाणसमयीं भूमी विदारी पहा,
नीलेंदीवरलोचने ! हिमजलें जो नाहलासे अहा ! ७

ज्येष्ठाषाढदिनीं सरोजनयने ! अम्भोद जे राजती,
कांते ! कांचनरक्तवर्ण असती नानाविचित्राकृती;
मासीं श्रावण आणि भाद्रपदिच्या, आकाशपंथांतुनी,
वेगें ताडिति तीव्र तोयद पहा धाराशरें मेदिनी. ८

काष्ठापासुनि उद्भवे अनल तो त्यापासुनी धूम हा,
धूमापासुनि जन्मला जलद हा आख्यात लोकीं पहा;
कांते ! पर्वत-कंदरांत पडतां कर्णीं तयांचा स्वन,
केकी चंद्रकधारि मोर भरिती मंजुस्वरें हें वन. ९

ज्यांच्या कुंकुमरक्तवर्ण तनुचा दे मोद चित्ताप्रती,
ऐसे सुंदर इंद्रगोप सखये ! येथें पहा क्रीडती;
आकाशीं नव मेघ हे विकसले कांते ! तयां पाहुनी
केकीनर्तक दंग होति सगळे लीलाभरें नर्तनीं. १०

आकाशांतुनि कृष्णमेघ विपिनीं धारास्त्रजां वर्षिती,
संग्रामीं मदमत्त कुंजर इथें दोघे जणूं झुंजती;
अम्भोद द्विरदासमान करिती वर्षाव पृथ्वीवरी,
झाला लुप्त विमानमार्ग नभिंचा इंद्रादिकांचा परी. ११

ज्यांचा घोर निनाद अश्व खर वा उन्मत्त हत्तींपरी,
वायूनें हलती नभीं विहरती शैलेंद्रसानूवरी;
सारें व्यापुनि टाकिलें गगन त्या अम्भोधरांनीं अती,
वारी संतत वर्षुनी जलधरें प्रक्षाळिली ही क्षिती. १२

पाहें अर्जुनवृक्ष शोभति कसे या काननीं मोहिनी!
यच्छाया घनदाटशी पसरली जी भूषवी मेदिनी;
मोदें बैसुनिया तयांवरि शिखी गातात मंजुस्वरीं,
ऐकोनी मधुगायना स्मर सखे! संचारतो अंतरीं. १३

मातेपासुनि दुग्धलाभ न जयां, पाण्यामुळें पांगले,
खाती गोमय कांसवें अहह! तीं स्वस्थान ज्यां लोपलें;
वायू भक्षुनि राहती सतत गे! जे लोचनीं ऐकती,
ते हे सर्प जलार्त आज वसतिस्थानाप्रती शोधिती. १४

यज्ञाश्वासम रम्य चित्रित असे ज्याची तनू गोजिरी,
तो केकीहि न इच्छितो अधिक हा वर्षाव भूमीवरी;
झाले हे भयभीत भेक अहिचा फूत्कार जाणूनिया,
पाण्यामाजि बुडोनि सर्व करिती आक्रोश तेथें पहा. १५

जेथें सुंदर इंद्रनीलमणिची कांती तृणें दाविती,
पक्षी गायन मंजु मंजु करुनी वृक्षांवरी क्रीडती;
घेवोनी युवतीस तो युवक त्या रम्यस्थळीं पातला,
क्रीडानंदभरें कदंब तरुच्या कुंजीं सुखें बैसला. १६

शोभे सुंदर लाल वस्त्र तनुतें तारुण्य देहीं वसे,
भार्येतें कमलें करें खुडुनिया मोदें युवा देतसे;
कांतांगावरि पद्मरेणु उधळी आनंदुनी मानसीं,
होई दंग मदालसा युवतिच्या श्रृंगारलीलारसीं. १७

उन्मत्त द्विपराज येथ विहरे सानंद पंकांतरीं,
मोठी भीषण गर्जना करितसे अम्भोदवृंदापरी;
ऐकोनी घनगर्जितासि उभवी बर्हीं पिसारा क्षणीं,
कांतेच्यासह केकि कूजन करी कामोन्मदें कामिनी ! १८

नीलाम्भोधरगर्जना भयद ती ऐकोनिया काननीं,
भीतीनें वनकेसरी रमतसे कुंजांतरीं जाउनी;
त्यातें दामिनि चंचला चमकुनी तेथेंहि भेडाविती,
जाई भूधरकंदरीं पुनरपी कांते ! मृगांचा पती. १९

शुद्धांत:करणें वदोनि वचनें ऐशापरी काननीं,
क्रीडासौख्य तिथें दिनान्तसमयापर्यंत संभोगुनी;
यानामाजि वृषांचिया बसुनि तो आला युवा मंदिरीं,
चार्वंगी ललना सुहास्य वदना बालासवें सुंदरी ! २०

अनंत विठ्ठल चित्रे.

## कविता.

### श्लोक.

सु--कविते ! कवि ते दयिते ! तुला
सजविती करिती अतुला तुला
मज न ये विनये ! कवि--सत्कृति
गति मुळीं न धरी कवनीं धृति १

समुदिता उदिता विधुता[1] जशी
करि सुधा--वसुधा बहुधा तशी
कवि--मुखीं सुमुखी ! उतरी तरी
रसिक--अंतर नंतर मंतरी २

यमक--हार विहार करीतसे
मधुनि वर्ण--समासमही तसे
नव--विभूषणिं भूषवितां अशी
सुर--वधू दिसते कविता जशी ३

रसिक--चित्त--विहारिणि मानिनी
स्खलित--नूपुर--घोष मृणालिनी
रचित मंजुल वर्णपदान्विता
सुकविता कविताप हरी स्वतां ४

सरस[2]--भाववती सुदती सती
रुचिरता मग ये मुदतीस ती
सकळ तें कळतें मन मानतें
मजसि साध्य अहा ! परि कां न तें ५

मदधुरां[3] मधुरां ललनाधरां
विरहिं चिंतित जेविं बसे घरा
सुकविते[4] कविते ! स्मृति अंतरीं
अदयते तुज काय ह्मणूं तरी ६

न करिं कोप, न कोपन हें बरें
सदयता धरिं ताप हरीं त्वरें

१ चांदणें. २ उत्तम भाव दाखविणारी. ३ मदानें धुंद (प्रत्ययाभावी द्वितिया) ४ क्रियापद.

कमल--कोमल--लोलल--लोचने !
अलि मलीन विलीनहि साहणें ७

न भवभूति विभूति विलोकिली
कविगुरूतनु तेंवि विलोपली
मदनबाणचि 'बाण' कुठें तरी
रसिकचित्त समाकुल जो करी ८

"कुहु कुहू" करि कोकिळ 'माघ' तो
कवन--आम्र--सुमंजिरि मागतो
हृदयिंचा तव हर्षचि 'हर्ष तो
तव तनूवरि बाष्पचि वर्षतो ९

ललित--वर्ण मुखी शुक 'दंडि' तो
कवि--विभूषणि ! भूषणिं मंडितो
विजय दे. 'जयदेव'हि देव ज्या
उपवनीं पवनीं रमला तुझ्या १०

वद ? सती असती कवि हे कुठें
बघुनि यत्कृति मन्मति लोपते
सुचिर[1] खेळुनिया महिमंडळीं
रुचिर[2] गेलि कुठें कवि--मंडळी ११

सजवुनी करुनी तुज सुंदरी
वसत भूवरि कीर्ति--सुमंदिरीं
असति होतिल आणिक ते जरी
तरि तदीय कुणास न ये सरी १२

---

१ फार वेळ. २ सुंदर.

न तसा कविसा तुज वाटतो
विरह हा अहहा ! हृदिं दाटतो
विरमलें रमलें विमले ! मन
कलविभाषिणि सोड मधुस्वन १३

कवळिला वळिला मलयानिल
मग मला गमला प्रखरानल
उमजला मजला नव बोध कीं
" कठिण कालिं सुधाहि विषास वी " १४

प्रकट भावहि अप्रकटीं वसे
सतत हांसत सांगत तूं असे
गजगतीं जगतीं बहु गूढता
उकलली कविलीनवती ! स्वतां १५

बुधजनीं विजनीं बसलों जरी
घडि घडी तुज आठवितों तरी
मन विलक्षण लक्ष न ठेवितें
तुजसि निंदुनि काय तरी असें १६

जगिं चराचरिं मी वसतों इथें
मजसि सोडुनि जाशिल तूं कुठें
अहह ! काय उभी जवळी असे
बरळलों मग काय तरी असें १७

दु. आ. तिवारी.

---

## कुरुसैन्यांतील एक अंतःकलह.

### आर्या.

गततातशोकदुःखें पीडितसा द्रोणकुमर शिबिराला—
येई सुयोधनाच्या, शमवाया अल्प दुःखवन्हीला. १
कृप मातुल सूर्यात्मज कर्णहि होते तिथें नृपाजवळ,
संगरविचार करिती पसरी रविसुत विशाल वाग्जाल. २
दुश्चरित सहचरांच्या संगें नृप कोण शर्व पावेल,
भाग्ययश लिखित भालीं दैवहता परि कसें पुसटवेल. ३
इतुक्यांत दीर्घरोदन ये ऐकायास त्या भटवरांना,
दिसला आक्रंदितसा अश्वत्थामा समीप येतांना. ४

शोकस्वरें वदे हा तात ! मला त्यजुनिया अनाथाला,
कैसा नुमजे सदया ! तुजलागीं स्वर्गवास आवडला. ५
काला ! कठोर हृदया ! स्नेहाधारास करुनिया दूर,
साधियला सुकृताचा ठेवा अन्यास जो नव्हे सुकर. ६
लढतां पडतास जरी समरीं इतुका न पावतों खेद,
'वधिलें धृष्टद्युम्नें कपटें' करि वृत्त हें हृदयभेद. ७
दुष्टा ! धृष्टद्युम्ना ! असिधरकर चूर्ण पूर्ण मी करिन,
त्वद्दय हृच्छोणित या मत्खड्गानें नभांत उसळीन. ८

कुरुपति, 'हे गुरुबंधो ! मित्रा !' संबोधुनी ह्मणे त्यातें,
शोकातें आवर या वीरा ! शिणवूं नको उगा तनुतें. ९
मृद्वंतर तव जाणें निजजनकीं भक्ति तीहि जाणतसें,
पथ भावि आक्रमाया या समयीं हृदय कठिन कर पविसें. १०

कृप भूपास ह्मणे हा सेनानायक करीं स्वसेनेचा,
दुःखोपशम कराया उगवाया सूडही तसा अरिचा. ११

कौरवनाथ ह्मणे अजि गुरुवर! निरुपाय खचित या समयीं,
मागेंचि वचन माझें गेलें कर्णास कीं तयाविषयीं. १२

निजदुःखावेग तदा थांबवुनी द्रोणसुत ह्मणे नृपवरा,—
विश्वासीं मजवरती बाहुबलें शत्रुचा करीन चुरा. १३
विजयरथासह दोघे नरनारायण महींत नुरतील,
मग सार्वभौम नृपवर ह्मणुनि तुला सर्वही मिरवितील. १४

कर्ण ह्मणे गुरुपुत्रा! करावया तुजसमान राजहित,
कौरवसेनेंत दुजा रे! नाहीं काय राजभक्तिरत. १५

अजि अंगराज! शोकावेगें हें बोललों, न राग धरा;
प्रज्ञ न ऐशा वचना देइल तो अंतरीं मुळीं थारा. १६

मग सूर्यपुत्र बोले मूढा! जो कुपित वीर बलशाली--
जल्पे न तो, कराया शिरतो की अरिकुलांत खांडोळी. १७

आटोपी ही रसना कर्णा! मंडूकसाच बडबडशी,
गमतें मातें सेनानायकतावारुणी चढे तुजसी. १८
अधिकारमत्त दुर्जन निद्रेंतहि दुर्वचेंच चावळती,
परिणामीं अयशाच्या डोहीं बुडती पुन्हा न वर येती. १९

जाणे मद्भुजबल हा भूप, तसा हाहि सत्यवादि कृप,
किंवा कुरुपांडवगुरु मत्तातचि तो गतासु निष्पाप. २०
तें तूंच मात्र नेणसि कळलें यावरुनिया उदारपण,
वाखाणिती तुला जे कळलें त्यांचेंहि आज सत्यपण. २१

कर्ण क्रोधें खवळे दावानल जेविं चंड वायूनें,
कंपिततनु मेघासम गर्जुनिया मग असें तयास ह्मणे:- २२
रे! ब्राह्मणाधमा! त्वां आत्मस्तुतिनें स्वदेह बाटविला,
संगरकौशल्य तुझें नोहे, जावेंस तीर्थयात्रेला. २३
तप आचरावयास्तव रिक्त गुहा वाट पाहातात तुझी,
अथवा देशोदेशीं नृपाश्रया जा करावया 'जी जी' २४
नच शूरवीर तुज़सम शोकाकुल गलितधैर्य होतात,
आहे विश्रुत सर्वां क्रितिसा रणचतुर तोहि तव तात. २५
येता धाउनिया निजशत्रु उदासीन मान वांकविता,
अप्रतिकारी कैसा शूर महात्मा कळे न मच्चित्ता. २६

प्रियतातचरितनिंदा कोणा मानीवराप्रति रुचेल,
क्रोधें दुःखें उठले गुरुसुतहृदयांत चंड कल्लोळ. २७
चपलेसम गुरुनिंदकजिव्हा छेदावयास असिला घे--
धावे, तों धरिला त्या समयचतुर वृद्धशा कृपें वेगें. २८

कर्णहि निजखङ्गासह धावे, धरिले तयास कुरुनाथें;
व्हा शांत शांत ह्मणती दोघा द्वंद्वा प्रवर्तलेल्यातें. २९

ह्मणि सोड सोड राजा! तृषित असिधृत अशा मम करातें,

मन्निंदकाधमाच्या रक्तें मी तर्पितों स्वखड्गातें. ३०
गुरुनिंदककंठ धडापासुनिया वेगळा करायाला--
फुरफुरती हात पहा, न निवारीं, सोड मातुला ! मजला. ३१

कर्णा ! वीरवरा ! तूं वेडेपण काय मांडिलें येथें ?
हो शांत, प्रज्ञासम, चित्तीं तूं जाणतो न कार्यातें ? ३२
बाळा ! गुरुतनया रे ! टाकुनि अरिहननकार्यओघातें,
संगर माजवितां कां ? उचित न हा कलहकाल दोघांतें. ३३
अधिकारीजनकलहा युक्त असा काल हा नव्हे बा ! रे !
जनकालस्थिति सारी आणावी मानसीं सदा चतुरें. ३४

" त्यजिलें हें शस्त्र पहा जोंवरि रविसुत असेल या महिंत, "
बोले गुरुसुत जो पितृ--भक्त चिरंजीवसा जनीं ख्यात. ३५

—————— महादेव भीमाजी कुळकर्णी.

## संध्या--शुक्र ! !

### श्लोक.

गेलों एक दिनीं वनीं विहरत प्रेमांत मी रंगुनी,
होता तो समय प्रशांत हृदय प्रेमें फुलें त्या वनीं;
संध्याराग--सुरंजितांबर करी तो अंशुमाली तदा,
चुंबी अस्तगिरीवरी अवनिला प्रेमें पुन्हा एकदां. १

ती संध्या--रजनी विहार करिती झाली नभीं काननीं,
प्रेमोत्फुल्ल मदंतरंग मग हो ! लाली मुखीं पाहुनी,
प्रेमानें करि हास्य घेउनि सवें ती पश्चिमादिक्सखी,
लाली अंबरीं ही तरी विलसली सौंदर्यपूर्णा--मुखीं २

नाथाची रजनी प्रमोदित मनें ती वाट पाहे सती,
येई अद्यपि अंबरीं न शशि तो, ताराहि ना दीसती.
वाटे पश्चिमदिक्सखीसह बसे उत्तुंग अद्रीवरी,
प्रेमानें मग लाल होइ रजनी पत्युत्सुका बावरी. ३

प्रेमाच्या लहरी उचंबळुनिया जाती तिच्या अंतरीं,
तारा सुंदर एक तों चमकला लालींत त्या अंबरीं;
वाटें कीं टिकली सुरक्तवदना लावी स्वभालावरी,
सानंदें मुकुटावरी हिरकणी कीं ही ? कळे ना परी. ४

प्रेमाच्या लहरी हृदीं उसळतां त्यांतून हा सुंदर
येई काय तुषार-बिंदु सहजीं ओघामधें तों वर;
कीं खोवी शिरपेंच लाल रजनी सौंदर्यदायी शिरीं,
घेई कीं मधु--गंध पुष्प करिं तें मच्चित्तहारी परी. ५

वा प्रेमें मधु हास्य ती करि तदा ही दंतपंक्ती दिसे,
कीं हें तोरण बांधिलें नभिं तिनें पत्युत्सवीं रम्यसें;
कीं आदर्श तिचे करीं वसत हा, पाही स्वरूपा निकें,
छे ! वाटे रमणीय कंदुक असे, क्रीडा करी कौतुकें. ६

तें चेतोहर अंबरीं विलसलें तद्रम्यतारांगणीं,
माझें चित्त भुलें, कळे न हृदयां तें काय; सांगा कुणी.
तों एका निमिषांत अंबर--मणी खालीं हळूं चालला,
प्रेमें मी बघतांचि हेतु मनिचा जाणोनि तो हांसला. ७

राहोनी क्षण एक अंबरिं तदा सानंद तो लोपला
आनंदीच भला विनाश-समयीं तो एकला वाटला;
तों रम्यांबरिं तारका विखुरल्या ! तो चंद्रमा तत्क्षणीं
पूर्वेला मधु--हास्य मोदयुत ये प्रेमैक--तारांगणीं ८

तारानाश विलोकुनी रजनि ती दुःखार्त ही भासली,
लाली जाउनि येइ पांडुर कळा मी तन्मुखीं पाहिली;
नाना येति वितर्क मानसिं तदा पाहूनिया ती स्थिती,
' सर्वांला जगदीश्वरें ठरविला तो नाश ' चिंती मती. ९

शुक्राची स्थिति ही ! वृथा रजनिचा आक्रोश सारा परी,
माया--मोहनजाल टाकुनि मना ! तूं चाल आतां तरी;
होई चित्त विषण्ण एक मग ये आलाप कर्णावरी--
" राहे तो जगदीश मात्र भरुनी नित्य स्वविश्वांतरीं. " १०

गिरीश.

---

## फुगडी.

( फुगडीची चाल )

आयुष्यांतिल कामें सरलीं,
विश्रांतीची आशा उरली;
श्रमसार्थकता बरी करूं,
खेळूं आतां फुगडी फूं, घालुनि पिंगा फुगडी फूं,
खेळूं आतां फुगडी फूं. १

दृढनिश्चय हा पदर खोंविला,
मळ अंतरिंचा सारा धुतला;
अद्वैताचीं पदें जुळूं,
खेळूं आतां फुगडी फूं, घालुनि पिंगा फुगडी फूं,
खेळूं आतां फुगडी फूं. २

प्रेमकरांची ग्रंथी केली,
निर्भय तनु मार्गेचि सारली;

आनंदाचा फेर धरूं,
खेळूं आतां फुगडी फूं, घालुनि पिंगा फुगडी फूं,
खेळूं आतां फुगडी फूं. ३

फेर घेतले दोन चार ते,
विश्व लागलें फिरावयातें;
थांबुं नको गे ! फिरूं फिरूं,
खेळूं अजुनी फुगडी फूं, घालुनि पिंगा फुगडी फूं,
खेळूं अजुनी फुगडी फूं. ४

अतिरेकाची कमाल झाली,
चित्त वृत्ति ही त्यांत बुडाली;
एकरूपता पहा उदेली,
खेळूं खेळूं फुगडी फूं, घालुनि पिंगा फुगडी फूं,
खेळूं खेळूं फुगडी फूं. ५

फूं फूं कारितां भान उडालें,
शद्वहि सुटला मौन राहिलें;
भ्रमण मात्र तें असें सुरूं,
तरिही खेळूं फुगडी फूं, घालुनि पिंगा फुगडी फूं,
तरीहि खेळूं फुगडी फूं. ६

प्रेमबंधनें सारीं सुटलीं,
शिथिल तनू भूवरी पातली;
नेत्र उघडिले तदा हळूं,
कैंची आतां फुगडी फूं, कैंचा पिंगा फुगडी फूं,
कैंची आतां फुगडी फूं. ७

गगन लागलें फिरावयातें,
कुठें घेउनी जाइ मला तें;
स्थिती कशी ती मुखें वदूं,
ऐशी झाली फुगडी फूं, झाला पिंगा फुगडी फूं,
ऐशी झाली फुगडी फूं. ८

स्थित्यंतर जाहलें स्थितीचें,
परी न माझें झालें साचें;
हसणें रडणें मात्र सुरूं,
बरी असे ही फुगडी फूं, बराच पिंगा फुगडी फूं,
बरी असे ही फुगडी फूं. ९

---

दु. आ. तिवारी.

## वसंतावतार.

### दिंडी.

मोदमूर्ते ! सुखसागरा ! वसंता !
सुखविं येउनि निजभूमिवधुस आतां
विरहक्लिष्टा तनु, धवल वदन झालें--
तिचें, यौवनिं जरि गात्रिं जरा खेळे[1] ! १

दिव्यकांती ! हा येतसे वसंत
सृष्टिवनिता[2] त्या भेटण्यास जात,--
तुरा[3] पुष्पांचा घेउनी करांत
खोंवण्या तद्वेष्टनीं स्नेहयुक्त ! २

---

१ कारण हिवाळा नुकताच गेला होता. २ कारण वसंतकालीं सर्वत्र नानातऱ्हेचीं फुलें विकसलेलीं असतात. ह्मणूनच सृष्टीचे हातांत फुलांचा तुरा दिला आहे. ३ पागोट्यांत, फेट्यांत.

घेति दोघें अन्योन्य चुंबनातें;
प्रीति शुद्धा तत्संगिं मोद वीते;
जिथें मिळती सम--भाव वस्तु दोन,
प्रीति आनंदुनि दिसतसें खुलून ! ३

दिवस ठेले हे पूर्ण वसंताचे,
सुरूं झालें कूजनहि कोकिलांचें,
नित्य--नूतन आणुनी स्वैर वाणी--
पक्षि मंजुल अस्पष्ट गाति गाणीं ! ४

नवी पालवि मृदु वृक्षवल्लरींना--
फुटुनि कुसुमोद्गम[1] होतसे तयांना
मुग्ध--बाला त्यांखालिं बसुनि घेती--
उंच ताना घेवोनि तंत्रि[2] हातीं ! ५

वनीं अल्लड सुकुमार युवतिजाती
पुष्पमालांनीं कंठ भूषवीती;
मुग्ध--कलिकांचे मुकुट शोभिवंत
एकमेकींच्या शिरीं घालितात ! ६

चित्रवर्णाच्या गंध--पुष्प--माला,
घालि रचुनी[3] प्रत्येक कबरिं बाला;
माल शोभे तन्नीलकलापांत
जसें चोचें तें इंद्रधनू ख्यात ! ७

कुणी फुगड्या तर कुणी तुंग झोके
जलक्रीडा कुणि, घेति कुणी पिंगे,

---

१ उद्भव, जन्म. २ वीणा. ३ गुंफून.

लपंडावहि कुणि मांडिती वनीं त्या,
खेळ यौवनिं हे युवतिजनीं जाल्या! ८

गमे,[1] विहरावें रम्य रविकरांत
स्पृहा उद्भवली तारका--मनांत
मुग्धयुवतीरूपांत विहरतात
ह्मणुनि भुवि या तृणनील[2] वनालींत! ९

लता लेवुनिया हरितदल[3]दुकूला
मधुप[4]--कच--कबारींत कुसुमभूषणाला--
उटणि रेणुचि लावोनि तरुवरातें--
परिष्वंगिति,[5] जशि नव--वधू प्रियातें. १०

इंद्र--आज्ञेनें संभ्रमोद्धतांची[6]
भूमिलीलापर[7] दिव्य अंगनांची
घंटिकांनीं युत नूपुरें[8] गळोनी
कुंजरूपा जणुं वसति तीं धरोनी! ११

सवें मधुकर[9] घेवोनि मधुकरीला[10]
काम[11]--कुसुमांतिल सुरस सेवण्याला;
तयीं रुंजी घालोनि प्रेमगीतीं
कुंजिं नंतर त्या सुप्ति मधुर घेती! १२

नृत्य कारिती आनंदभरें शेतें
धान्य--श्वासानें दाविती मुदातें;

---

१ वाटतें. २ दाट गवत उगविल्यामुळें नीळ्या दिसणाऱ्या वनराजींत. ३
हिरव्यागार पानाची झिरझिरीत वस्त्रें. ४ भृंगरूपी केसांच्या वेणींत. ५ आलिंगन देतें.
६ घाई घाईनें वर विघून जाणाऱ्यांची. ७ भूमितलावर क्रीडा करण्यांत दंग अस-
लेल्यांची. ८ पैंजण. ९ भृंग; कामी नर १० भृंगी; कामिनी. ११ आम्रवृक्ष.

सौख्य सेविति तें शेतकरी धन्य,
स्नेह कष्टासह सौख्य करी मान्य ! १३

किती जाईचीं, जुई मोगऱ्यांचीं
कुरबकांचीं किति, तेविं कमलिनींचीं
फुलें परिमळयुत, कथिति मोदुनीया
सुखद मधुवैभव सकल देहिनां या १४

विटप[1]--हस्तांजलि भरुनि नभिं कृतार्थ--
होउनी त्या तव मधो ! स्वागतार्थ,--
मंजु--मंदानिलें[2]--कंपिताम्रपंक्ती
गळन्मंजरीसुमनास[3] उधळिताती ! १५

स्फटिक--निर्मल जल, धवल नद्या, स्रोत,
जागजागीं पाहून वाटतात
तुझ्या सैन्यें जयकेतु[4] रोंविलेत
शिशिर--परिभव केलास जइं, वसंत ! १६

नुरे ठावहि तो नगर--जनमुदाला,
उभारोनी तो व्यक्त करि गुढ्यांला;
*पांचि पांडवही येति पहायाला,
सवें घेउनि निजसखिस--द्रौपदीला ! ! १७

स्मृती, विस्मृति, आनंद, सौख्य, शोक,
एकवटुवुनि षडरीहि ते अनेक,--

---

१ शाखा, खांद्या; शाखारूपी हस्तांजलींत. २ सुखदायक व मंद मंद वहाणाऱ्या वसंतवातानें हललेल्या आंबराई. ३ गळणाऱ्या मंजरीरूपी फुलांना. ४ पताका. * पाडव्याला गुढ्या उभारल्यावर त्या खालीं पांचि पांडवांच्या शेणाच्या प्रतिमा करून ठेवतात त्यास उद्देशून.

शुद्ध प्रीतीला जन्म मधो ! देसी
विश्वमोदाकृति होउनी रहासी ! १८

आजि दिनवरि भुवि राज्य करुनि मानें
हांसवोनी तीं गोजिरी प्रसूनें
फुल्ल तारक--कुसुमास करायाला
व्योमिं संप्रति तो श्रेष्ठ मधू गेला. १९

अरविंद.

---

## स्वर्गीं भेट घडेल !

### श्लोक.

जन्मा येउनि अर्ध मासहि तुला कन्ये ! न झाला पुरा,
तों संसार पुरा करून अपुला गेलीस लोकांतरा;
वार्ता ही श्रवणांतरीं मम शिरे संतप्त तैलापरीं,
शोकव्याकुल जाहलों; उसळल्या खेदोर्मि हृत्सागरीं. १

“ गेल्याचा करणें न शोक ” वदती ज्ञाते अशीं भाषणें,
येतां तोच पण प्रसंग रडती तेही मृतांकारणें;
मायामोहनिगूढ मूढ बनवी देवाधिदेवेश्वरा,
माझी काय कथा ? वृथा स्तुति नको; वेडा बने मी पुरा ! २

केली कां इतुकी त्वरा ? उठति या नाना मनीं कल्पना,
‘ कीं संसार असार ’ म्हणून पटली अल्पावकाशीं मना;
‘ माया--जाल करील बद्ध पुढतीं ’ ही भीति येतां मनीं,
कीं मुक्त्यर्थ्य उपासिला द्रुत तुवां प्रेमें जगाचा धनी ! ३

‘ कन्या एक असे दुजी उपजली कोणास होती हवी ?
माता या कटुभाषणीं तुजसि कीं निष्प्रेमता दाखवी

आला कोप ह्मणून ? जन्म दिधला कां या स्थलीं तूं मला ?
हें धाष्ट्यास पुसावयास्तव तुवां स्वर्लोक कीं गांठिला ?

निर्मी मूर्ति बहु श्रमें पण न ती चित्तास वाटे बरी,
तेव्हां मोडुनि मूर्तिकार तिजला तो टाकितो; त्यापरी;
होती ज्यापरि कल्पना न बनली त्वन्मूर्ति तैसी श्रमें,
वाटे लाज; ह्मणून शीघ्र तुजला नेई विधाता गमे.

आनंदें नव मास भार तव जी वाहून गे ! स्वोदरीं,
देई जन्म तुला; तुला नच जिच्या प्रेमा त्रिलोकांतरीं;
गे ! नानापरि कष्ट सोसुनि तुझें केलें जिनें रक्षण,
जावें लोटुनि दुःख--सागरिं तिला हें काय सल्लक्षण ?

झाली गोष्ट जुनी; उपाय नुरला सारें खरें हें कळे,
बाळे ! शल्य परंतु हें निशिदिनीं माझ्या मनीं या सलें;
केली मूर्ति तुझी अदृश्य अदयें कालें; तयाला पण,
नष्टप्राय करावया स्मृति तुझी येणार नाहीं क्षण !

रम्या मूर्ति न एकवारहि तुझी म्यां देखिली लोचनीं,
कर्णीं आयकिला तसा न तनये ! त्वन्मुग्ध मंजु--ध्वनि;
प्रेमें त्वन्मुख चुंबिलें न तनये ! ऐशा अभागी जना,
बाळे ! तात ह्मणावयास तुझिया वाटेल लज्जा मना !

कन्ये ! दोष परंतु यांत लवही माझा न झाला खरें,
हा ! हा ! योग असा घडूनच दिला त्या पूज्य विश्वंभरें;

झालें दग्ध तुझ्या अखंड विरह--ज्वालानलें यन्मन,
पाहें ! हा तव तात तेथ करितो शोकाश्रुसंतर्पण ! ९

‘ प्रेमाचें जगतांत तात जननी ’ बोलास या बोलती,
तूतें प्रत्यय हाय ! पूर्ण उलटा आला खरा संप्रति;
नेलें ओढुनि अंतकें तुज बळें तैं सोडवाया त्वरें,
कोणीही नच पातलों; सकलही गे ! दूर झालों खरें. १०

केली ही क्षणभंगुरा नरतनू विश्वाचिया नायकें,
मृत्यूतें चुकवावयास जगिं या प्राणी न कोणी शके
तूं गेलीस तसाच काल भरतां येईन मी जेधवां
स्वर्गीं भेट घडेल शाश्वत तुझी कन्ये ! मला तेधवां ! ! ११

——— विष्णु बाबाजी कुळकर्णी.

## वेडा गोसावी.

### दिंड्या.

गमे गोसावी होउनी फिरावें,
वनीं स्वच्छंद भ्रमण तें करावें;
असे मजला मग काय कुठें न्यून ?
जगत्प्रभुची मानसीं पटे खूण. १

कधीं निर्झर--मधुसलिलसुधापानें,
कधीं नवविकसितकुसुमसुगन्धानें,
कधीं वनखग--रसभरितकूजनानें,
रंजविन मानस ईशसुगुणगानें. २

वरिन एकांता--शान्तिच्या सुकांता--
ईशभक्तांच्या वृत्तहरा दूता,

जगाची परवा काय तदा मातें,
शान्तिशस्त्रें छेदिलें बंधनातें. ३

कधीं गिरिशिखरीं स्वैर बैसुनीया,
कौतुकें पाहिन मजा जगाची या;
दरीमाजी बैसून सदा सारीं--
सृष्टि--गूढें उकलीन मनोहारी. ४

कधीं मोजित बैसेन उडुगणांतें,
तयातें विनविन "न्याच अहो! मातें--
तारकांनों! तुमच्यासमीप; तेथें--
शान्तिसुख तें लाभेल सत्य यातें." ५

कधीं अरूणोदयिं रक्त भास्कराला--
कौतुकें पाहिन; तोषविन मनाला,
कधीं अवलोकिन शीत रजनिनाथ,
त्यास धरण्याला पुढें करिन हात. ६

वेडगाणें तें कधीं गातगात,
वायुवरि बैसुनि उंच खगोलांत--
उड्या मारिन, विश्वास गीतनादें--
भरुन टाकिन निर्भेळ--सत्य मोदें! ७

असा आनंदें करिन मी विहार,
भक्तितरुला येईल मग बहार,
ईशगुणगानें होइन मी वेडा--
वेड लाविल विश्वास--असा वेडा! ८

——————— जनार्दन श्रीकृष्ण देशपांडे.

## आरती सद्गुरुची.

जयदेव जयदेव जय सद्गुरुनाथा ॥ जय स्वामीनाथा ॥
निजबोधामृतवर्षकघन, विश्वोद्धर्ता ॥ धृ० ॥

काषायांबर स्वामिन्धृत मानुषवेशा
दंडकमंडलुमंडित खंडितभवपाशा
सर्वाशा–तृण--पावकसद्गुरुसर्वेशा
पर-धन-दार-विवर्जित शरणागतरक्षा १

ब्रह्मपदाश्वविराजित बोधसुखङ्गधरा
भयशोकासुरहंता मणिहरमल्हारा
निजमुक्तीअधरामृत प्राशक षट्पादा
सज्जन-मानस-हंसा जयनित्यानंदा २

भव-कारि-कुंभ-विदारक हरिसद्गुरुनाथा
संसृति-विपिन-दवानल जलधरसुखदाता
निज विस्मृति-तम-भास्कर स्वप्रभयतिनाथा
निजजनजन्मशतार्जित अघ-मोचकताता ३

जयभक्तचकोरा शांति–प्रदचंद्रा
तत्वज्ञानविबोधक सद्गुरुयोगेंद्रा
त्रयविधताप–निकृंतक जयपरमानंदा
द्रष्टा दृश्या दर्शन विरहित स्वानंदा ४

तत्पद वाच्य महेश्वर त्वंपद जीवात्मा
वाच्यातीता लक्षा केवल परमात्मा
लय विक्षेप कषाय स्वादन विघ्नहरा
हंकृति--व्याल वि-नायक त्रिभुवनउद्धारा ५

विनायक बोवा टोपरे.

## गंगेचे उपकार.

### श्लोक.

हे गंगे, उपकार काय तव हे होतात माझ्यावरी!
जेव्हां निद्रित हें असे जग तदा देसी मला जागृती
जीं या संसृतिंत क्षणोक्षणिं नवीं होतात दुःखें मना
तीं सारींहि महाप्रवाह तव हा नेतो समूळ क्षया! १

गंगे! तूंच खरोखरी शिकविलें प्रीती कराया मला
तैशीं हीं शिकलों तुझ्याचकडुनी मी गायनें गावया!
जी जी नीरस सृष्टि तीहि सुरसा मानोनि घ्यावी कशी
हेंही तूंच मला खरें पढविलें, अत्युक्ति नाहींच ही! २

आलोकांतरिं विश्वचालक अशी आहेच शक्ती कुणी
गंगे! हें तुझिया जना शिकविलें तूं आपुल्या गायनीं
तैसा दाखविलास मार्गहि मला ती शक्ति जाणावया
गंगे! हे उपकार सान न बरे! येती न वर्णावया! ३

हे गंगे! बसलीस तूंच मजला आराम होवोनियां
नाहीं नाहिं तुझ्याविणें मज अतां लोकांत या आसरा!
देवी! प्रेमतरंगपंक्ति तव ही वेडावते मानस
त्वच्छ्रेय:प्रदचिंतनाविण दुजें कांहीं न व्हावें अतां! ४

हा तेजोमय भानु नित्य उगवो, येवो उषाही नवी
पुष्पोद्रिक्तरसार्द्रवायुलहरी वाहो सदाही भली!
या त्वत्तीरिं वसावया घडिघडी मातें मिळो देवते!
हे संगीत तुझें सदैव रुचिरे! कर्णीं पडो या बरें! ५

---

नागेश.

नोव्हेंबर १९१४ 	वर्ष २५ वें

# काव्यरत्नावली.



## अंक ११ वा.

## तुषारकण.



पद.

सौख्यानंदाचा सुरम्य प्रभात मोजेचा !
बालभानुकिरणीं जहाली रंजित ही धरणी.
हर्म्याग्रावरुनी हर्षला कवि शोभा बघुनी
मंद वायुलहरी फुलांचा मधुर गंध पसरी,
त्या लहरींवरती बसोनी तुषारकण येती.
कारिती मधुलीला चुंबिती तरुणीवदनाला !
कुसुममृदुल शिशुचे कपोलहि भूषविती साचे.
हांसविती सकलां, बालकें कारिती वृद्धांला !
प्रेमल हृदय जसें सुकोमल तुषारकणहि तसे.
स्वर्गींच्या देवी सुनिर्मल शोभति हे तेंवी
स्तिमित तदा झाला
बघुनि कवि वेडावुनि गेला ! १

कमलदलांवरती निवसुनी कांहीं कण हंसती.
लतिकांवरि बसुनी डोलती रमती स्मित करुनी.
आनंदानंद ! धांवती गगनीं स्वच्छंद
खेळ बघुनि त्यांचे हरपलें भान तदा कविचें

बालच तो झाला विसरुनी स्वप्रौढत्वाला !
बाल्यानंदांत
गुंगलें विदग्ध तच्चित्त ! २

" चिंता लेश नसे ठाउकें केवळ एक हंसें !
हंसा ! हंसा ! सारें विश्वही हंसो तदनुसारें !
नाचा ! डोला हो ! चराचर पावो सुखलाहो !
गा ! गा मधुगाणीं ! स्वर्गही येइल तीं श्रवुनी !
वृष्टी ही तुमची विनिर्मिल माला सुरतरुंची !
प्रेमाचा सेक करुनि हा हलवा जडलोक !
हृदय पातक्यांचें निकेतन करा सुशांतीचें !
प्रेमपरीवाह वाहुनी वाढो उत्साह.
गाइन मग गाणें
तुह्मांला मी आनंदानें ! " ३

" सोडुनि आकाशा उतरले तारे कीं दिवसा ?
रत्नें उधळीलीं देवतरुकुसुमें कीं गळलीं ?
मोत्यांची माला दिनश्री बघे करायाला !
हास्यविनोदाचे लोटले अश्रु अप्सरांचे !
दिव्यें स्वर्गींचीं घेउनी रूपें कणिकांचीं—
नीरस लोकीं या सुधारस आलीं वर्षाया !
नित्यनूतना ही चारुता भूषवि काय मही ?
दुःखें झांकाया प्रमोदचि जगांत पसराया—
भाग्योदयकालें
कुतूहल मूर्तिमंत आलें ! " ४

" असा तुझी कोणी परी जग गेलें मोहोनी !
शुष्मत्कांतीनें शिरविलीं भूविवरीं रत्नें !
तारा लाजोनी स्ववदनें घेती झाकोनी !
काय मधुर तेज ! जाहलों धन्य खचित आज !
हांसा हो हांसा ! स्वर्ग हा आला भुवि सहसा !
वेडे व्हा नाचा
काल हा प्रेमानंदाचा ! " ५

होतें आकाश शांत परि करीत शुचि हास !
तरुगण निष्पंद ! गंधवह वाहे बहु मंद !
लता ताल देती ! प्रमत्तहि मधुप सूर धरिती !
पुढें पुढें आला दिवाकर मुग्ध जसा झाला !
मोदें अनुरागें चराचर डोलाया लागे !
भूतमात्र गेलें खरोखर वेडावुनि गेलें !
निघतां कविवदनीं
रुचिर ही नवपद्यश्रेणी ! ६

कुतुकें बसलेला अकस्मात् चमकुनि कवि उठला
" काय कणां झालें ? न कळतां कोठें ते गेले ?
दुःखपूर्ण अवनी ह्मणोनी गेले कीं गगनीं ?
पाप्यांच्या, भासे, पळाले विषमय उच्छ्वासें !
चारुत्व न एथें ह्मणुनि कीं गेले परतुनि ते ?
अदृश्य कां झाले ? कळे ना कोठें ते लपले ?
मीही जाईन तयांसह गाणीं गाईन !

आशाभंगांत कशाला राहूं मी एथ ?
उपलब्धी त्यांची काय मज कदा न व्हायाची ?
कोठें असतील ? मला ते केव्हां दिसतील ?
त्यांचा कर धरुनी अंबरीं जाइन मी उडुनी !
तारामंडल तें ज्या स्थलीं प्रेमगान करितें--
तेथें जाईन चिरसुखीं विलीन होईन !
काय इथें आहे ज्यावरी मन गुंतुनि राहे !
तुषारकण परि ते भेटतिल कुठें कसें मातें ?

हीहि अभाग्याची
आस कीं पूर्ण न व्हायाची ७

उदास कवि बसला टेकुनी करतलिं शीर्षाला
अश्रुनदी प्रबला लोटुनी भिजवी भूमीला.
गाढ तिमिरराशी राहिला वेढुनियां त्यासीं.
मग कांहीं कालें उठे तो पुसुनी नयनजलें;
बघुनि सभोवार विषण्णहि झाला अनिवार.
" तुषारकण गेले ! खरोखर नष्टच ते झाले !
माझीही आस सत्य कीं आहे तो भास ?
मग तें मरण बरें ! कशाला जगणें दुःखभरें !
वेडावुनि गेला कवी तो शून्यहृदय ठेला

प्रेयास्तव कोणी
न झाला वेडा या भुवनीं ? ८

—— —— —— —— एकनाथ पांडुरंग रेंदाळकर.

## उडणारा पक्षी.

### दिंड्या.

विहगराया ! गा ! चालला कुठें तूं,
काय मनिंचा तव सांग गड्या हेतू;
नीड सोडोनी जवें व्योमदेश--
स्वैर गतिनें तूं किमपि गांठितोस. १

प्रियेकडुनी संदेश काय आला ?
बहुत झाले दिन भेटुनी तियेला
तिनें धरिला कां तुजवरी अबोला
म्हणुनि जाशी तिज भेट द्यावयाला ! २

पहा ! आतां रे ! सांज होत आली
सुखें गावूं ये काय अंतराळीं !
दिमाखानें परि उडत उडत स्वैर
बघत फिरशी कां विश्वचमत्कार ! ३

कवण बालेच्या प्रणयपत्रिकेस
जाशि घेउनिया कळे ना मनास
अशा समयीं तुज पाहतां नितांत
अहा ! भासे तूं खरा प्रणयदूत. ४

सोडवाया कां मुक्तिचे प्रमेय
सिद्ध करण्या परब्रह्म परम ध्येय
करित स्पर्धा कां चालला नभांत
कांहिं उमजे ना होइ गड्या भ्रांत. ५

तुझ्या गानानें उठति मर्त्यदेह
असा जो तूं कथ तुझें नांव गेह

तुझें माझें मागील असे नातें
काव्यनिर्झरि ती दाखवीं अज्ञातें. ६

कुणी दुखवीलें तुझ्या मानसाला
ह्मणुनि जगताचा वीट काय आला !
कशानें तुज उपरती अशी झाली
चालला कां करण्यास स्वर्ग--केली ! ७

खिन्न झालेलें हृदय शांतवाया
जगत् सोडोनी जाउं नको राया !
करूं ऐक्यानें हृदय गड्या ! शांत
जरी आहों समदुःखि या जगांत ८

दिसेनासा क्षणिं बघत पक्षि झाला
स्वीयकार्या करण्यास उडुनि केला
सतत राहावें जनीं कार्यमग्न
जरी दैवें जाहलें मधें भग्न. ९

उडत असतां पक्ष्यांस अंतरीक्षीं
सुपथ दाखवितो नित्य; सर्वसाक्षी
शेषशायी भगवान रमा--कांत
तोच दाविल मज सु--पथ या जगांत. १०

मंजुबाळ.

## संसारभीति.

हरिणी वृत्त.

परम करुणा सिंधो ! बंधो ! प्रभो ! इकडे पहा;
अहह ! बुडतो मोहीं डोहीं तुझा मत दास हा !

भज नच असे आतां त्राता दुजा तुजवांचुनी;
झडकरि तरी तारीं मातें कृपाकर देउनी. १

भवजलधितें बा! या जाया तरून तुवां दिली—
मज नरतनूरूपी नौका कृपे बहु चांगली;
तरत असतां बैसूनी मी तिच्यांत भवाब्धि हा—
अवचित मला गांठी मोठी विपत्ति अशी अहा! २

हर! हर! सुटे हा कामाचा प्रचंड समीरण!
कितिक बसती झोंके नौकेप्रती अति दारुण!!
बुडवुनि जळीं मातें नेते तळास पळांत ही!
मजसि गमते उद्धाराशा नुरे मम अल्पही! ३

बल न लवही राहे पाहें विवेक-सुनाविका;
बघ भडकली भारी वेगें तरी जलतारका!
भिडुनि खडका क्रोधाच्या ही बुडेल महाजळीं;
तुजविण विभो नाहीं कोणी जगांत दुजा बळी. ४

जलचर मला भक्षायाला मदादिक उत्सुक,
टपुनि बसले वासोनीयां भयावह हे मुख;
खचित मजला हे खातील क्षणांत बुभुक्षित;
म्हणुनि सदया! धावें पावें मजप्रत तूं द्रुत. ५

त्रिभुवनिं तुझी कीर्ती गाती 'दयानिधि तूं' अशी;
पण लव नसे या दीनाची दया तुजला कशी?
पळ मज जगन्नाथा! आतां उपेक्षिसि तूं जर
खचित घडतो त्वद्दासाचा विनाश पुरा तर. ६

त्वरित म्हणुनी येईं; नेईं लया मम संकट;
तिळहि न मळूं द्यावा देवा! तुवां स्वयशःपट.

मजसि करुनी यांतूनी तूं विमुक्त दयानिधे !
मजवर जगद्राया ! माया दया तव राहुं दे. ७

पतकरुन ही भाषासेवा कृपे तव मीं मुदें,
अजवर मनोभावें केली असे करुणानिधे !
घडवुनि सदा माझ्या हस्तीं तिजप्रति शंकरा !
मज बहु दये देईं अंतीं तुझ्या पदिं आसरा. ८

बहु जळ यथाकाळीं वर्षो महीभर वारिद;
तव बहु कृपे हो सस्यांची समृद्धि सुखप्रद;
जगिं गद तसे दृष्टीलागीं पडोत न आपदा;
बहु सुख तशी शांती नांदो धरातळिं सर्वदा. ९

——— कृष्णाजी बाबाजी कुळकर्णी.

## शून्याकाश.

### श्लोक.

होता शोभत केधवा दिनमणी कान्तिप्रकर्षान्वित
केव्हां इन्दुहि शारदीय अमृतोत्सेकीं मुदें डोलला
संशान्तप्रभ तारकाविलसनें भूषा कधीं पावलें
केव्हां हें नभ जाहलें मधुवियद्गंगोर्मिघाताकुल ! १
श्यामाम्भोधरमालिका विहरली केव्हां जलोद्गारिणी
सन्ध्यारंजितशुभ्रमेघशकलें चारुप्रभ क्रीडलीं
नाचे सुन्दर इन्द्रकार्मुक कधीं कौतूहलोद्दीपन
केव्हां मण्डित जाहलें गगन हें चंचत्तडिन्नर्तनें ! २
होत्या अस्फुट गात हांसत कधीं दिव्यांगना गायनें
प्रेमोद्दीपित लोचनांतुनि जलें संवर्षलीं केधवा

दिव्यांचीं मधुचुम्बनें घडुनिया दाहीं दिशा रंगल्या
झालें विश्व समस्त निद्रित कधीं गुंगून वीणारवीं ! ३

आनन्दैकनिधान तेंच नभ हें संशून्य झालें कसें ?
शून्याचेंच पहा जगीं पसरलें साम्राज्य सर्व स्थलीं !
आहे तीव्र चिताग्निधूम भरला फेकीत विश्वा तमीं
हा ! हा ! धांवति लोचनांतूनि कशा उष्णाश्रुधारा पहा ! ४

माझीही स्थिति जाहली विधिवशें देवा ! कशी सांप्रत--
दग्धानन्द मृताश शून्यहृदयें शून्यांत मी राहतों
हास्याच्या किरणांवरी पसरला अंधार दुःखाश्रुचा
प्रेमाच्या रमणीय नन्दनवनीं दावाग्नि संचारला ! ५

पुष्पांतील सुगन्ध, वायुलहरी, कृष्णेन्दुमन्दप्रभा
यत्नें आवरितांहि जाति सुटुनी हातांतुनी ज्यापरी
माझें तें मजपासुनी निसटुनी गेलें पळोनी तसें
आकाशांत अनन्त दूर बसलें जाऊन ताऱ्यापरी ६

जाते होउनि शीर्ण नाललतिका वज्राभिघातें जशी
माझें तें मजपासुनी हरपतां झाली तशी मत्स्थिति !
आहे सांप्रत गाढ नैश तिमिरें भूगोल हा झाकला
ती येईल कधीं तरी नव उषा--आशाच नाहीं मज ! ७

प्रेमाचे मधुराश्रु, रम्य हसितें, आनंदसंगीतकें
प्रेमाचीं रमणीय चाटुवचनें, विश्रम्भसंलापही
नाहीं याविण अन्य हेतु धरिला ज्यानें कशाचा मनीं
तो मी सांप्रत हाय ! हाय ! जळतों आहे वियोगानलीं ! ८

------------ एकनाथ पांडुरंग रेंदाळकर.

## सागरा !

### पद.

( चालः— वीरा भ्रमरा— )

गड्या सागरा ! तुझ्या तिरावरि बसतों मी येउन,
संगें मन्मित्रा घेउन. १
तुझी भव्यता पाहुनि येती मनीं विविध कल्पना,
वाटे विस्मय माझ्या मना. २
लाटा उसळति अहा कितीतरि दिसती त्यां ना पुन्हां,
जाती कोठें त्यां सांग ना. ३
निरनिराळ्या समयीं तूझे अरे ! खरोखर किती,
विचित्र देखावे दीसती. ४
रवी टाकितो मावळतांना कमान तुझियावरी
मनोरम दिसते ती कितितरि. ५
सोसाट्याचा वारा सुटतो तुफान होतें कधीं,
व्यग्र हें चित्त होतसे तधीं. ६
मध्यरात्रिच्या समयीं तारे गृह आणि चंद्रमा,
होती पोहायाला जमा. ७
सौम्य रूप हें सोडुनि होसी उग्र कधीं तूं अती,
तेव्हां सारे तुजला भिती. ८
अशा सागरा ! तुजला कोणी सांग ह्मणीं निर्मिलें ?
तयाची नमिन सदा पाउलें. ९

राजारामसुत.

## शरदतु वर्णन.

(श्रीमद्भागवत दशमस्कंध अध्याय २० च्या आधारें कांहीं फेरफार करून)

वृत्त—मंदाक्रांन्ता.

वर्षर्त्वंतीं शरदतु रिघे लोपली मेघमाला,
नीलाकाशीं रवि विलसला मंद वायू जहाला;
योगभ्रष्टें पुनरपिहि तीं अंतरें शुद्ध जैसीं--
प्राणायामें; सुविमल सरिज्जीवनें होति तैसीं. १

होती जैसे ऋषि गृहधनत्यागयोगें सुशांत,
तैसे रिक्तांबुदहि दिसले शुभ्रसे अंबरांत;
क्षीणायू हें, अणु सुख नसे; भोगितो नित्य दुःख,
वार्याभावा न कळुनि तसें थिल्लरीं मीन देख २

पूर्णावस्था मिळवित सुधी त्यागितां देहमाया,
पंका तैशी त्यजि; कठिन भू होइ शेतें पिकाया;
आत्मज्ञानी त्यजुनि पठना लावितो जेंवि ध्यान,
तेंवी नीर स्थिर जलधिचें शांत होई तुफान. ३

जैसा ज्ञानी पुरुष करितो इंद्रियांचा निरोध,
पाण्यासाठीं कृषिवल तसा बांधि शेतास बांध;
श्रीकृष्णाला व्रजयुवतिचें पाहुनी दुःख नासे,
तैसा नष्ट प्रखर रविचा ताप चंद्र--प्रकाशें. ४

गंधोद्दाम प्रसृतसुमनोद्गंधि आरामकारी,
चौंहोभागीं अनिललहरी खेदतापांस वारी;
शोभे रात्रीं गगनिं कमलाकार नक्षत्रपुंज,
तैशा उर्वीवरि कुमुदिनी वृक्षवेलीनिकुंज. ५

शेतें आलीं नवि विपुलते धान्यसमृद्धि झाली,
आनंदानें सण सजविती लोक सारे दिवाळी;
वर्षाकालीं अडकुनि गृहीं राहिले सर्व आतां,
कामाधंद्या निघति पुढती हा शरत्काल येतां. ६

विठ्ठल कृष्ण नेरुरकर.

## पंचवटी वास्तव्य.

( भाषांतर--वाल्मीकिरामायणे अरण्यकांडे सर्ग १५ )

साक्या.

जाउनि तदनंतर मृगहस्ती शोभित पंचवटीतें
राम वदे त्या उज्ज्वलकांती लक्ष्मणास बंधूतें; १
" अगस्तिमुनिनें निदर्शिलेल्या देशाप्रत वच आलों;
पंचवटी ही पुष्पितकानन, सौम्य, बघोनी धालों ! २
फेकीं दृष्टी चोहिकडे वनिं, निपुण तयांमधिं असशी !
करितां आश्रम होइल सुखकर पाहिं कोणत्या देशीं ! ३
वैदेही कीं लक्ष्मण अथवा रामहि रमेल जेथें
ऐसा शोधीं देश; असावा निकट जलाशय तेथें ! ४
वनशोभेनें, जलशोभेनें, मनरमणीय प्रदेश,--
पाहीं, जेथें सहज समित्सुमकुशजलकाष्ठिं प्रवेश ! " ५
परिसुनि वच रामाचें लक्ष्मण हस्तांजलि विनयानें--
करुनि, जानकीसमक्ष भाषण बोले बहु मोदानें, ६
" तव तंत्रीं रत दास सदा हा, जरि सन्निध शतवर्षे !
' रुचिरप्रांतीं या करिं आश्रम ' आज्ञापी बहु हर्षे ! " ७
विनितवचें या होउनि हर्षित, दिव्यद्युति रामानें
निरखुनि वन, मग सर्वगुणान्वित वरिला देश मनानें ! ८

नंतर आश्रमबंधनहेतुस्तव तेथें जावोनी,
सौमित्रीला कथिलें मोदें, हस्ति हस्त घेवोनी, ९
“ सौमित्रे ! हा देश समानहि, श्रीमान् पुष्प--तरूंनीं !
रम्याश्रमपद येथ करीं कीं जावी मति बघ भुलुनी ! १०
निकट दिसे बघ पद्मशोभिता रम्य पद्मिनीही ती !
सुरभिगंधयुत पद्में खुलतीं दिनकरसम जलप्रांतीं ! ११
ब्रह्मज्ञानी अगस्तिमुनिनें वर्णियली जैसी ती,
तैसी गोदावरी ठसे बघ पुष्प--तरूंनीं नेत्रीं ! १२
कारंडव--हंसांनीं सेवित, चक्रवाकशोभित ती
मृगयूथांनीं मनहारिणी नच अतिदूरा, अतिनिकटीं ! १३
मयूरनादित, बहुकंदर, ते उंच गिरी बघ नेत्र
रिझविति दर्शनिं रम्य सौम्यही, होउनि तरुसुमव्याप्त ! १४
तथा रौप्य कीं सुवर्ण अथवा ताम्रवर्ण तरुकांती,
वेउनि मज ते भासविती कीं चित्रित गज या प्रांतीं ! १५
साल--ताल--खर्जूरतरूंनीं, तिवस--पनस--वृक्षांनीं;
कदंब--पुन्नागांनीं जातीं गिर्‍यंगें बघ खुलुनी ! १६
केतक-चंपक-तिलक-अशोकहि जाती आम्रीं मिळुनी !
गुल्म-लतावृत्त, पुष्पित त्यांचीं अंगें गिरि धरि भुलुनी ! १७
स्यंदन, चंदन, पळस, खदिर, घव, ओट, सावई, लोध्र,
किंशुक, पाटल महिवरि पाडिति छाया जैसें अभ्र ! १८
सौमित्रे ! स्थल खगमृगसेवित पुण्य रम्य हें शांत !
तात ! जटायूसवेंच सेवूं वन गंभीर निवांत ! ! ” १९
परवीर्याचा अरि, अतुलप्रभ, तेजोनिधि सौमित्री,
रामाज्ञेनें आश्रम नीर्मी, प्रीत जयें ती धात्री ! २०

---

१ गोदावरी.

भित्ती रचिल्या सौमित्रीनें उत्तम त्या मातींनीं;
केल्या स्तंभित स्तंभांनीं, ते बांधियले वेळूनीं; २१
अंथरिल्या त्यांवरती शाखा सुंदर शमीतरूंच्या;
कुशकाशांच्या पर्णें केली आच्छादित मग उटजा; २२
भूमीतल मग समान केलें सुमहानल सौमित्रें!
प्रेक्षणीय उटजा बघुनी कां नच हर्षावें मित्रें[1] ? २३
नंतर गोदावरीजलीं तो रत होई आरामीं!
शुचिर्भूत होऊनी आणी फलपुष्पें बहु नामी!! २४
दिधला सुमबलि; केली शांती यथाविधी मग त्यानें;
आश्रमपद मग दावियलें त्या रामा उत्सुकतेनें! २५
बंघूकृत सौम्याश्रम बघुनी राम मनीं बहु धाला!
भार्या पुलकिततनु पाहोनी आनंदीं रत झाला!! २६
आली सगळी उचबळोनी राघवबंधुप्रीती!
अनुजकंठिं ते सहजच गेले हस्त--दुजी कां रीती? २७
"अनुजा! तुजवरि प्रीत असे मी; केलें मोठें कार्य!"
राघव वदला "आलिंगन, ब़ा, मजला येथें प्रदेय!! २८
भावज्ञहि तूं कृतज्ञ बंधो, पित्र्यापरी धर्मज्ञ,
त्राता असतां, मानूं कैसा मृत दशरथ मी अज्ञ?" २९
म्हेहें ऐसें बोलुनि अनुजा, लक्ष्मीवर्धक राम
बहुफलफुलयुत त्या देशीं तो मोदें करि आराम! ३०
श्रीसीतेची, अनुजाचीही, सेवा कांहीं काल—
घेउनि धर्में, रामें केलें स्वर्ग भूमिचें[2] वाल!! ३१

———

नाथ.

१ सूर्यानें. २ वनांत.

## एक कूट.

( वृत्त प्रमाणिका. )

कुणी धनांत लोळती,
कुणी विपन्न पोळती
कुणी रथांत बैसती,
कुणी स्वपादिं चालती १

कुणा मिळे पटच्चर,
कुणा महार्घ अंबर
कुणा भिकार गोधडें
शरीर झाकतां नडे २

कुणी घरांत बैसती
धनोत्थ सौख्य लाहती
कुणी धनार्थ हिंडती
सहोनि कष्टसंतती ३

सदन्न ह्या नरा मिळे,
कदन्नही न त्या शिळें
गजान्तसंपदा इथें,
रुका न एकही तिथें ४

करोनि पुण्य दुःख हा--
सदैव सोशितो अहा !
करून पाप सौख्य तो--
विलास दिव्य लाहतो ५

बसोनि आळशीच हा
निजार्थ लाहतो अहा !

भगीरथप्रयत्न तो
करोनि नार्थ लाहतो
विचित्र भोग कां असे
नरास देव देतसे
सदैव कूट हें मम
मनःस्थ लोपवी शम ६
समान भोगसंतती
नरास कां न लाभती ?
समान दृष्टि ईश्वरा
असें न आढळे नरा ७

——————— विद्याधर वामन भिडे, बी. ए.

प्रेम-वचन !

पद.

प्रेम नसे मम हें लटिकें
बहिरंगावरि तसें निकें
भृंगासम मी नाहींच
सांगतसें हें तुज साच ! १
वीज कडकडो ! नभहि पडो !
धरणिकंप हो ! प्रळय घडो !
पर्वतसम मत्प्रेम असे !
अचल सखे ! तुज दाऊं कसें ? २
रूपीं तुझिया नच भुललों !
विषयेच्छें नच वाहवलों !

प्रेमा सात्त्विक वश झालों
वियोग होतां तळमळलों ! ३

तनुमनधन तुज अर्पियलें
ओस तुजविणें जग सगळें !
हृदयिं रेखिली त्वन्मूर्ती !
तुजविण मज नच गे ! स्फूर्ती ! ४

लक्ष्मी ! गृहिंची तूं शांती !
प्रेमलता ! तूं मम कीर्ती !
कविता ! तूं मत्प्रिय दयिता !
सर्वस्वें मी तव आतां ! ५

तव गुणगणिं मम मन रमुं दे
प्रार्थित हें ईशासि मुदें !
प्रेमळ अखंड हो सुगुणे !
मागतसे तुज शशिवदने ! ६

" नाथ ! देह दिसती दोन
हृदयें परि तीं नच भिन्न !
साच ' वचन, हें मम जाणा !
पाहिजेत का त्या आणा ? " ७

" नकोत सखये ! त्या शपथा !
साच वचन तव हें आतां ! "
हृदया तेंव्हां हृदय मिळे !
प्रेमदंवानें सुमन फुलें ! ८

शारदासुत.

## भूपाळी भार्गवरामाची.

श्रीमद्भार्गवराम भृगूद्वह जमदग्नीसुतवरा
कालकामअग्रजा रेणुकानंदन परशूधरा १
तेजोबलधृतियशोदायिनी पवित्र नामावली
प्रभातकालीं मुखें गातसे सुख शांती लाभली २
तपोनिष्ठ तो पिता पतिव्रतधारी माता सती
अखंडसेवारत तूझाला पाहुनियां डोलती ३
पितृवाक्य तें प्रमाण मोठें माता लघु मानिली
योग्य तुझी प्रकृतीच पुरुष हून कमी लेखिली ४
पित्यांपासुनी वर मागुनियां पुन्हां तिला उठविली
मातृप्रेमहि तशी प्रकटवी बंधुप्रीती भली ५
अशा रीतिनें मानवरूपें प्रत्यक्ष श्रीहरी
कालक्रमणा करीत होता प्राकृत जनरेपरी ६
लक्ष्य परंतू अवताराच्या पवित्र कार्योद्गमीं
होतें तुमचें वास जरि असें रम्यवनीं स्वाश्रमीं ७
अशांत राज्यश्रीमददर्पित जो जगतीं जाहला
सहस्त्रार्जुन क्षत्रिय राजा दैववशें पातला ८
सार्वभौम मी राजा परि ना उत्थापन दे मला
मुनिमौनत्वें फारचि कोपे मानभंग वाटला ९
निजदेहाचें भान न ज्याला पूर्ण समाधी वरी
काय तयाला राजा अथवा सुरेंद्र आला जरी १०
सत्ता कांता लक्ष्मी परते पूर्ण फजित होउनी
ब्रह्मस्थिति ही असे एकचा अनुभवि ती तो मुनी ११
ज्ञान असे परि बलसामर्थ्यें अध पुरें होउनी

विनाशकाला जवळ ओढिती ब्रह्मच्छल करुनी १२
उच्छेदी वन सकल ऋषींच्या धेनूहरणीं रिघे
भ्याला तुझ्या येतां बघतां स्वपुरा येण्यां निघे १३
ध्यानमग्न तो पिता आपुला आपणही साधनां
समित्कुशादी मिळवायाला गेला होतां वनां १४
इरि निजलेला छावा त्याचा वनगत तें पाहुनी
दरीं शिरावें मदें गजानें दैवें संमोहुनी १५
तेंवि साधुनी संधी पुनरपि कार्तवीर्य भूपती
मुनीपुढें टाकला येउनी हस्तपाद कांपती १६
शस्त्रें केला विकल देह तो ठेवी जो मारुनी
स्वयें मुनी हठयोगें आत्मा ब्रह्मांडीं नेउनी १७
कृतार्थ झालों असें मानुनी नगरातें द्रुतगती
गांठी गांठ न होवो तुमची होउनिया भयमती १८
वडिलांची ती दशा पाहुनी शोकाकुल पळभरीं
मृदुता ऋजुता सुटली दारुण कोप शिरे अंतरीं १९
क्षत्रियबीज न ठेवी कोठें निश्चय केला मनीं
सत्र मांडिलें स्कंधीं परशू धारण तैं करुनी २०
प्रथम धाडिला स्वर्गीं अपकृति कर्ता हैहयपती
एकामागुन एक सर्वही वधिले पृथ्वीपती २१
एकवार ना एकवीसदा जगतीतल धुंडुनी
क्षत्रिय दिसतां मुक्ति देतसां परशु शिरीं हाणुनी २२
असें भागतीं जेथें तेथें रणकंदन माजवी
क्षत्रियतेजाहुनी ब्रह्मबल अधिक जगा दाखवी २३
निःक्षत्रियभू केली क्षत्रियरुधिरन्हद सांठवी
स्वस्थमनानें निजपितरातें रक्तजलें तर्पवी २४

अशा प्रकारें व्रती राहुनी पितृऋणें फेडिलीं
गृही होउनी पुत्रवितानें कल्पना न शिवली २५
पृथ्वी दिधली दान कश्यपां निजवासा मेदिनी
सह्याद्रीच्या खालीं केली सागर तो हटवुनी २६
क्षेत्र वसविलें द्विजसंघाचें नूतन चित्पावन
बद्रिकाश्रमीं तपोबलानें केलें चिर जीवन २७
धनुःशास्त्र पढवितां सुशिष्यां भजतां सद्भक्तिनें
खूण मिळे इतिहासपुराणीं भीष्मकर्णवर्णनें २८
ब्राह्मणवर्गा साक्ष पटावी निजतेजाची असें
आपद्धर्मज्ञान व्हावया चरित्र केलें तसें २९
हे पितृवाक्यतत्परा । राका, चंद्रवदन देवा
बा । कोटिसूर्यरूपा । बापा, नित्य घडो सेवा
गा । परशुधनुःपाणी । पाणी वरद शिरीं ठेवा ३०
तुझा करुणा पाहुनि यावी द्विजस्थिती संप्रतीं
असंख्य करितों हात जोडुनी बालक परशू नती ३१

परशू.

---

## प्रलोभन गीत.

### दिंड्या.

- तव निवासस्थल सांग असें कोठें
सर्व सोडुनि येईन सत्य तेथें
तुझ्यावांचुनिया पूर्ण सौख्य पाही
अखिल सृष्टीतल धुंडितांहि नाहीं १
रुचिर उद्यानीं घोर अरण्यांत
उच्च शिखरीं वा खोलशा दरींत

तमद्युति यांतून मी कुठेंही—
यावयातें माघार घेत नाहीं. २

इंद्रियातें संमोह पाडणारा
दिसतसे जो मज चहुंकडे पसारा
त्यजायाला कायसा वेळ यातें
कल्पलतिकासुम ये जरी करा तें ३

हृदयसागर भडकोनि तुफानानें
परम कोलाहल मांडिला तयानें
कवण तीरा मज नेतसे कळे ना
आवरीता तुजवीण तरि दिसे ना ४

कढे अंतर तुजवीण हें किती तें
जरी मजला दाखवावया येतें
खचित हृदया उकलोनिया क्षणांत
पुरविता कीं सर्वही तुझा हेत ५

तुझ्यासम सद्गुणश्रेष्ठ नाहीं—
कधीं कोणी पाहिला ऐकिलाही
याचसाठीं विश्वास असे पोटीं
'हेतु विफल न मम' आस असे मोठी ६

———— महादेव भीमाजी कुळकर्णी.

## महा स्वप्न.

पूर्ण करि महा काल, पूर्ण करि अनंत गगन,
निद्रामग्न महादेव देखिछेन महान् स्वपन.

रवींद्रनाथ.

साक्या.

महाकाल परिपूर्ण करुनि, नभ अनंत केलें पूर्ण;
निद्रावश मग महादेव तो प्रचंड पाहे स्वप्न. १
विशाल जग हें प्रकांड तेंच स्वप्न मनोहर खास,
हृदयनागरीं तदीय येई बिंबोपम उदयास. २
उदया येती चंद्र सूर्य ते, ध्वांता लोकाहि येती,
लक्ष लक्ष नक्षत्र--वृंद ते दर्शन गगनीं देती. ३
दलांदलांहीं ग्रहोपग्रह किति हंसताती स्वस्थानीं,
गमनोत्सुक रजनीस धरी दिन सुहास्यमुख कवळोनी. ४
चिरदिन वसुनी एकाकी हा महासिंधु करि गान.
सहस्र येती तदा धांवुनी न्हाया तत्पदलीन. ५
निर्झर--मृदुरव, तटिनी--कलरव, आर्णव गीत गभीर--
परिसुनि गगनविहारी घन ते करिति गर्जना स्वैर. ६
आश्रय सोडुनि 'हा हा' शब्दें गाई झंझावात.
काननवीणा वाद्य वाजवी भीमवीर्य शतहस्त. ७
रुद्रालापें हिमराशीही पडूं लागती दार,
अट्टहास घनीभूत घोर जणु करिती पर्वतदैत्य. ८
महारण्यशिर जटा-पूर्ण तें हालूं लागे धीरें,
झरझर मरमर गभीर गाया उद्भवती रसभारें. ९
दिवस दशादिशां करी चेतना कोलाहल परिपूर्ण,
निशातापसी झिल्लिकारवें जपूं लागते मंत्र. १०
जमती सारे दाहि दिशांनीं येउनि गान करीत,
महाहृदीं मग उठवुनि देती महास्वप्न--संगीत. ११
स्वप्नराज्य हें, सर्व जीव--गण हे रहिवासी त्यांत,

घेती वारंवार देह नव, होती किति ही नष्ट. १२
फुलांचेच फळ बनतें, फळ तें बीजस्वरूप घेतें,
बीजें पडतां तींच काननीं धरिती तरु देहातें. १३
बाष्प बने घन, मेघ, वारिकण वर्षिति अवनीवर ते,
निर्झर होउनि नद्या फोडिती प्रस्तरमय कांतें. १४
निदाघ मरतां स्मशानभागीं वर्षाद्रुत येवून,
निववी त्याची प्रज्वलित चिता अश्रुजलां वर्षून. १५
वर्षा होई वृद्ध, शिशिंही धरी श्वेत कच शीत,
ययातीपरी पुन्हां वसंता यौवन होतें प्राप्त. १६
एक मात्र ती व्यक्ति पुरातन, सगळे इतर नवीन;
पुरातन ह्रदीं स्वप्नचमत्कृति करिती ते निर्माण. १७
अभाव किंकर आहे मानव स्वप्नसृष्ट अपूर्ण,
जागृत सेवी पूर्णत्वानें प्रयास किति भोगून. १८
सदा चेतना उडवूं पाहे अर्धचेतन--छाया,
करी हीच दिनरजनीं आशा, गुंतवि मन त्या ठायां १९
पूर्णत्मा जागेल ! काय तो दैवें दिन उगवेल ?
जगत् स्वप्न हें अपूर्ण धीरें कदा नष्ट होईल ? २०
चंद्र--सूर्य--तारका--ध्वांतता स्वप्नमयी ही छाया,
ज्योतिर्मय त्या ह्रदीं हळुहळूं मिळेल तीची काया. २१
पृथ्वी सारी होउनि भस्म, ग्रहगण फुटुनि अनंत,
अब्धिबुद्बुदासमान विलया जातिल एकपळांत. २२
चंद्रसूर्य ग्रह बृहज्ज्योतिला धारण मग करितील,
महादेवमय जीवात्माहे प्रळयांतीं होतील. २३
महास्वप्न--विच्छेदनदिन तो कधीं देव ! येईल ?
सत्यसमुद्रीं अर्ध सत्य हें काय लया जाईल ? २४

अर्धं प्रलयजलीं तें बुडुनी गेलें रे ! तव हृदय
प्रलयाचा होईल देव ! वद पूर्ण कधीं तो प्रलय ? २५

आनंदीरमण.

## जीवित-सरिता.



पद.

( चाल—जरी कुणा श्रीमं० )

पूर्वकर्मगिरिचें उदरीं जन्म घेउनी ही
जलद जलद आयुष्याची नदी स्रवत राही ! ॥ ध्रु० ॥

बाल्य--वीचि उठती, अंतीं विश्रमास द्याया
सौख्यपूर्ण तारुण्याच्या तरंगीं रमाया
खिन्न पुरुषतेच्या लहरीं तोहि लीन व्हाया
जराग्रजें भेटायाला जाइ तूर्ण तीही ! पूर्व० १

जरा धवलकांती, धरुनी आस भेटण्याची
मृत्युसिंधुपतिला, स्रवते त्वरित त्याकडेंची;
अशा निघुनि जाती मनुजा, सकल काल-वीची
युक्त विकारांनीं होई नित्य नदी रे ! ही ! पूर्व० २

गुप्तपणें त्वरितचि वाहे अशी, भेटण्याला
नदी पुढें आयुष्याची पूर्वेच्या स्थितीला;
ज्ञान-वीचि जाउनि तीच्या, जाइ शुष्कतेला
द्वैततांहि विसरुनि जाईं शाश्वतींत राही. ! ! पूर्व० ३

अरविंद.

# काव्यरत्नावली.



अंक १२ वा.

## श्रीहनुमच्चरित.

### सप्तम शतक.

आर्या.

जय जय जगदाभरणा ! रामहृदयभूषणा ! प्लवगराया !
पाजुनि चरणजलामृत वांचवि शमवुनि विभो ! भवगरा या १
नमन तुला रिपुदमना ! भयदा रिपुमुख्यकामदेवास,
करितां दास्य तुझें पदिं पुरवुनियां भक्त--काम दे वास. २
जयजय ! लंकादाहक सीता--संदेश--वाहक--विमाना,
चरितसुधारस सेवुनि संतोषें डोलवोत कविमाना. ३

संहारक दुरितांचा असुरांचा मूर्तिमंत धाक उभा,
संरक्षणास माझ्या ठेवूं कीं जावयास देउं मुभा. ४
अपकार फेड झाली सोसूं कैसा असह्य छळ याचा,
गांजील हा अधम मज यातें देतां निरोप जायाचा. ५

न कळेल राघवातें वृत्तांत निरोपही न हा जातां
उभयमनोरथ--पूरक सदुपाय वदें वदे सती ! आतां. ६

श्रीराम शीघ्र यावा छळ माझाही न अधिक वाढावा,
असुरविनाशें माझी मुक्ति कराया उपाय काढावा. ७

वंदुनि भूतनयेला बोले कपि हा तुझा नियत दास,
हरिल उभयभयचिंता माते ! होऊं नको मनिं उदास. ८
प्रभुदर्शनास जातों चिंता मनिंची तुझ्या सकल हरितों,
वृत्तांत साग्र कथितों लंकेशवधार्थ आणितों हरि तो. ९
मी स्मर्तृगामि माते ! स्मर मातें संकटांत पावाया,
रिपुजीविता कराया हरिनाम जसें भवातपा वार्या. १०
भय न तुला कोणाचें काळाचा काळ राम मीहि तसा,
सुग्रीवलक्ष्मणान्वित वानर रिपुशीं करूं समर हितसा. ११
तुजसह रामभजनिं मी दक्ष सदा पक्षिराजसा हरिचा,
स्मरतां येइन जंव हो स्फोट न संतप्ततैलिं मोहरिचा. १२
आशीर्वाद मला दे जाऊं दे दिवस नेमिला भरला,
ऐसें वंदुनि विनवी जो शतयोजन भवांबुधी तरला. १३

सद्गदगलाश्रुनयना काककृतक्षतकथा तयास कथी,
जा परत ये त्वरेनें निर्विघ्न क्षेमपूर्ण पाव पथीं. १४

आज्ञा होतां सतिची जाय सुवेलाद्रिच्या शिरीं, उतरे;
वाढे पर्वतसा, घे उड्डान, नभीं पतंगसाच तरे. १५
बघुनि तया खग पळती ह्मणती भीमस्वरूप हें काय,
रघुवरनामें फोडी हांक नभा स्वर्गीं भेदुनी जाय. १६
घेतां उड्डान पदाघातें गिरि भूदरीं रुतोन रिघे,
देतां बुडी जलांतरिं नर जैसा उसळि तो नगहि वरि घे. १७
त्रिकुटपुरी हादरली उदधिहि करि गर्जना भयद फार,
असुर भयाभित झाले कपिचा जाणोनि विक्रम अपार. १८
लंकाद्वीपचि नेतो उचलुनि कीं सकल सागरीं बुडवी,

कीं वदति भयानक या रूपें सकलां पदातळीं तुडवी, १९
असुरेश्वर घाबरला स्मरला शैलादिदत्त शाप मनीं,
चित्तीं स्वयें वरमला कपिच्या असमर्थ जाणुनी दमनीं. २०
पडती गळां पतींच्या कामिनि कवटाळिती मुलें पितरां,
वृद्धें स्तंभ धरिति उरिं तरुणी तरुणां न लाजतां इतरां. २१
हंबरडे पशु फोडिति खिंकाळति अश्व घोर नाद खर,
बोंब करिति जन जैशी नगरातें अग्नि लागतां प्रखर. २२
आक्रमिलें नभ कपिनें त्रिजग सकल घुमविलें बुभुःकारें,
आनंदें सुरकिन्नर यक्षादिक पूजिती सुमनहारें. २३
वासंतिकसौंदर्यश्रीमंडितशैलराजसा कपि तो,
सिंधु जसा वडवानळ नभरूपि गमे महा तटाक पितो. २४

वंदुनि मैनाक पुन्हां प्रार्थी कर जोडुनी महा--कपिला,
मंजुलरवें तयाला तोषवि दे जेविं माय हाक पिला. २५
निजशुभकरकमल शिरीं ठेउनि मैनाकशैल गौरविला,
उड्डान पुन्हां केलें त्वरित पहाया ककुत्स्थकुल–रविला. २६

सागरतीरीं वानर चिंतातुर मार्गिं लाउनी दृष्टी,
ह्मणती अजुनि न कां ये कपिकुलमणि, बहुत जाहले कष्टी. २७
एक वदे जाऊं या सकलहि शोधार्थ वायु–तनयाचे,
बोले दुजा पहा हो कैसें अविवेकपूर्ण मन याचें. २८
दश योजनें न उडवे शतयोजनमार्ग आक्रमील कसा,
बोले तिजा भला रे! लक्षिसि पर-वर्म-मीन तूं बकसा. २९
एक वदे हा होऊं सागर पर्वतशिलादिकीं सारा,
ठठले कितीक वदती उशिर नको त्वरित कार्य हें सारा. ३०

हांसति इतर तयांनां क्षुल्लक आह्मीं अनंत सागर हा,
आणाल हिमाचलही न पुरेल दया करा निवांत रहा. ३१
वडवाग्निला स्तवूं या जो सागरशोषणीं सदा रतला,
बोले दुजा नको रे! खोदूं ही भूमि पाडुं दार तला. ३२
ह्मणती दुजे किती रे! मूर्खासम कल्पना अशक्य वदा,
आह्मीं झुरतों कपिच्या आगमना चित्तिं चिंतुनी शिवदा. ३३
पडला व्यसनीं न कळे झुंजाया राक्षसासवें रमला,
चुकला मार्गचि किंवा सीतादेवीस शोधितां दमला. ३४
रुसला आह्मांवरि कीं भेटाया श्रीस चुकवुनी गेला,
कीं एकलाचि शिणला आह्मांवरि ह्मणुनि काय रागेला. ३५
हनुमंतास्तव ऐसा कपिंचा साऱ्याहि जीव कळवळला,
तंव सिंहगर्जनेचा श्रवणपुटीं नाद खोल आदळला. ३६

आनंदामृतवर्षक कपिचंद्र महेंद्रगिरिकडे वळला,
चंद्रोदयीं उदधिसा कपिमानसजलनिधी उचंबळला. ३७
मग अंगदादि सारे हर्षें आलिंगिती कुशल पुसती,
सीता सुखी असे कीं राघवकांता सुकोमल--वपु सती. ३८

साद्यंत वृत्त सांगे सुरसाकृतविघ्न सिंहिका--निधन,
लंकादेवीमर्दन सीताशोधन अशोकवनदहन. ३९
दारुण संग्रामरणीं वध जंबूमालिसहित अखयाचा,
निर्दलन दैत्यचमुचें सुतशोकहि वालिपुत्रसखयाचा. ४०
सद्बोध रावणासीं केला न रुचोन मानिला तुच्छ,
वसनें नरनारींचीं जमवुनि बांधोनि जाळिलें पुच्छ. ४१

तेणेंचि दग्ध केली लंका नगरी समग्र सहजपणें,
असुरां अशक्य झालें निजवित्ता सुतकलत्रसह जपणें. ४२

गर्जेति जयजयकारें कपि, जय बलभीमकी पवनसुतकी,
यद्विक्रमें जहाला लंकाधिप निजजनांसहित सुतकी. ४३
आनंदें कितिक पदीं लोटांगण घालिती कितिक नमिती,
शुभपुच्छ चुंबिती किति पुष्पें किति जमविती तया न मिती. ४४
करुनि सुकोमल शय्या श्रमलांत विभो! उसंत घ्या ह्मणती,
भक्तेच्छापूरक तुह्मि साच करा त्रिजगिं गाजते ह्मण ती. ४५
अत्याग्रहें विनवुनीं निजविति पदकमल करतलें चुरिती,
कुरवाळिती कितिक ते श्रम सकलहि अंग मर्दुनी हरिती. ४६
पुष्पांचे हार गळां अर्पिति किति खोंविती तुरे मुकुटीं,
पडली असेल अरिची दृष्ट ह्मणुनि कितिक योजिती मुकुटी. ४७
बहुविध मधुर फळांचे ढीग करिति विनविती क्षुधा शमवा,
ही बहुत अल्प सेवा कपिंची स्वीकारुनी सुयश कमवा. ४८

हनुमंत वदे कपि हो! झालें निर्दिष्ट कार्य रामाचें,
परि बहुत असे उरले दिवस न हे सेवकां विरामाचे. ४९
जाऊं या त्वरित निघा सीतासंदेश राघवा कळवूं,
नियमित कालातिक्रम झाला स्तवनें कपीश्वरा वळवूं. ५०

अंगद वदे कपे! तव कविहि न वर्णूं शकेल चतराई,
सर्वार्थ सिद्धिदा तुज होऊं देऊन काय उतराई. ५१
प्राण कपींचे रक्षुनि अर्धाधिक रिपुसमूह संहरिला,

त्रिजगांतक असुरेश्वर जंबुकसा भीतसे तुला हरिला. ५२
तूं श्रेष्ठ अह्मां सकलां तुज वहनविहीन चालवूं कैसा,
मान्य करा विनती या दासाची स्कंध–पालखीं बैसा. ५३

वदति इतर कपिराया! आह्मां असमर्थ मानिसी काय,
शीण न देतां तुजला सकलहि वाहूं क्रमें महाकाय. ५४
न रुचे विचार ह्मणतां न रुचेल ह्मणोनि वज्र देहानें
केलें अद्भुत कथिलें, तुज गमतां योग्य वज्र--देहा नें. ५५
थकले सकल नुचलवे अंगदही लाजला सखेद मनीं,
बोले बलगर्वाच्या, केलि भली युक्ति कपिसखें दमनीं. ५६
अर्भकसे तुज आह्मीं अपराध तुझा पदोपदीं घडतो,
देतो कवळ जननिला बाळ जसा अन्यथाहि बागडतो. ५७
न विषाद मानितां ती कुरवाळी कौतुकें स्वतनयाला,
तैसी क्षमा करावी अज्ञ अह्मीं विसरतोंच विनयाला, ५८
बलभीम माउली! जय, जयजय बलभीममाउली! ऐसा,
घोष करित पथिं चालति अन्योन्या सुचविती स्मरणिं ऐसा. ५९
प्रस्रवण नगाजवळी करित टवाळी विनोद बहुधा ते,
येतां वदति कपीशा! प्रियलाभें तप्त चित्त बहु धातें. ६०

मधुसेवनीं भुकेलें मन कपिंचें पाहतां मधु वनातें,
कर्पूरसमीपस्था वाटे उल्हास जेविं धुवनातें. ६१
आज्ञा घेउनि सत्वर घुसले मधुकाननीं प्लवगवर ते,
वनरक्षकां न पुसतां चढले मधुसेवनार्थ तरुवरते. ६२
आकंठपान करिती तृप्त नव्हति झगडती परस्पर ते,
उन्मत्त होउनी किति फेंकिति इतरांस माखिती पुरते. ६३

ढकली दुसऱ्यास कुणी धरणीवरि फेंकि कोणि गगनांत,
चिडुनि उलट भलत्याला मारिति न धरूनि भय लव मनांत. ६४
कोणी सुस्वर गाती वेडाविति करिति खिन्न मन त्याचें,
श्रीमुख कुणी मृदंगासम बडविति धरिति ताळ गाण्याचे. ६५
चढला उन्माद तरू मोडिति झोडिति परस्परां सकळ,
निर्भयपणें विहरती चिथविति काढुनि परस्परांस कळ. ६६
वनपालक कपिपतिचे येतां वनरक्षणार्थ धांऊन,
जर्जर करिति तयांना ह्मणती सांगा नृपास जाऊन. ६७
मधुवनविध्वंसकथा वनरक्षक कळविती दधिमुखातें,
ह्मणती कपि वनिं शिरले संचित मधु सकल जाहले खाते. ६८
नायकती नाटोपति मारिति आह्मांस वारितां निकरें,
फिरविति गगनीं टाकिति धरणीवरि पुच्छ हें धरोनि करें. ६९
चढला कोप निघाला सहसैन्य तयांस धाक दावाया,
पावोन तीच कुदशा घालविलें यश न जें कदा वाया. ७०
परउत्कर्ष न सहवे अपमान तसाच वाढला त्वेष.
मागाया दाद निघे नृपनिकटीं धरुनि दीनसा वेष. ७१
विदित करी सकल कथा हनुमंतासह वदे कपिदलानें,
मधुवन विलया नेलें ताडुनि मज, रक्षकांसहि खलानें. ७२
उन्मत्त ते सकलही आज्ञा अवमानिती तुझी राया
दे प्रबल सैन्य सत्वर गत यश मिळवावया अधीरा या. ७३
राया वदे कपींचा प्रियवार्ता ऐकिली तुझ्या वदनें,
श्रमलास तूं श्रमविले प्रिय कपि माझे वृथा तुवां कदनें, ७४
मत्कार्य तें न करितां नच येते परत वदन दावाया,
वनविध्वंस कसा वद करिते अविचार घोर दावा या. ७५

जा शीघ्र वद तयांनां मधुपानें तृप्त होउनी त्वरित,
घ्याया विश्रांति चला सुग्रीवपथप्रतीक्षणा करित. ७६
सांग तयां श्रीरामा भेटीची फार लागली आस,
पलघडि पुसे तुह्मांला बघतां होइल मनास उल्हास. ७७
त्यां पाज मधुरतर मधु नलगे तुज मातुलास सांगाया,
वार्ता मधुर, तयांची मधु रसना मधुर वाक्स्वनें गाया. ७८
गा धन्यता तयांची स्तवुनि तयां तोषवूनियां धाड,
न मधुवनिकादिकांची प्रभुकार्याची असे मला चाड. ७९
वदतां कपींद्र ऐसें मार्ग धरी तो सखिन्न दधिवदन,
चिंती पराजितें म्यां दावावें रिपुस केंवि हें वदन. ८०
रिपु केंवि ह्मणों प्रभुही प्रियवन विध्वंसितांहि मोदानें,
गौरव करी तयांचा संतुष्ट करीं वदे सुमधुदानें. ८१
मधु चाखिल्यास करितो शिक्षा देहांत; दंडही मजला,
तो आज कपीश तया गौरविण्या ध्वंसकांसही सजला. ८२
गेला चरणीं नमला वदला घ्या मधुर मधु कपींद्र हा
मन योजि तदागमपथिं, मनिंहि तशीं इंद्रियें कपींद्र दहा. ८३
आज्ञा सुग्रीवाची कळवोनि वदे प्रभो ! कवण काजा,
जावोनि भागलां जी कार्यमहत्व स्मरा गमुं नका जा. ८४
आज्ञा शिरसा वंदुनि सुचवी सहचर कपींस हितसाच,
अल्पांत माधुरी बहु अतिरेकीं हो कुतोषहि तसाच. ८५
व्हा सिद्ध तृप्त चित्तें सत्वर रघुराजदर्शनास चला,
व्यापूनि हालवो नभ जयजयकार प्रतिध्वनी अचला, ८६

सुग्रीवरक्षकांचा परिसुनि संवाद रामचंद्र वदे,
सखया वनविध्वंसक कपिगण तुझिया मनास कां द्रव दे. ८७

सुग्रीव वदे प्रभुजी ! शिखंडनदंड मधुवनीं शिरतां,
जाणुनि हें कपिगण कां धीर ध्वंसावयास तें करिता. ८८
आजवरी स्वामीचें मन झुरतें सर्वकाळ जी कारितां
तीतें शोधुनि आले झाले कृतकार्य काळजी करितां. ८९
यास्तव निर्भय मानस मधुवनिं गेले हरावया शीण,
अपराध मी न गणिला कृतकार्याचें फिटावया रीण. ९०
ऐसें वदे कपीश्वर तंव गगनीं जयजय ध्वनी उठला,
संदेह सर्व फिटला मिटला परिताप वादही तुटला. ९१
सौमित्रही जयध्वनि परिसुनि येवोनि राघवाजवळी,
बोले प्रभो ! मज गमे आले कृतकार्य कीशराज बळी ९२
विजयपताकाच जणों पुच्छें गगनीं उभारिलीं दिसती,
गर्जत जयजयकारें आले घेवोनि शुद्धि कीं सुदती. ९३
इतुक्यांत अंजनीसुत ठाके सन्मुखचि अंगदासहित,
कपिसैन्य तयांमागें कर जोडुनि याचिती प्रभूस हित. ९४
प्रथम रघूत्तमचरणां वंदुनि लक्ष्मण—कपीशपद वंदी,
गुणगण वर्णी प्रभुचे करपुट जोडून होउनी बंदी. ९५
श्रीराम वदे सखया ! झाला वृत्तांत सर्व आयकवीं,
तुजसम न दिसे जगतीं मनुजांत सुरासुरांतही सुकवी. ९६
शुभवार्ताश्रवणार्थी आतुर मन आज फार वळवळतें,
तुजसम परोपकारी कोण असें दुःखिताजवळ वळतें. ९७
सीतेस पाहिलें कीं काय तिचें वर्तमान सांग मला,
पवनात्मजा ! तवागम भुवनत्रयलाभसा मला गमला. ९८
पदकमलीं स्वशिरकमल वाहुनि सद्गदमनें वदे वाचा,
म्यां देखिली जनकजा जी जीवात्मा मदीय देवाचा. ९९

आठवली दीनस्थिति सतिची; अश्रुप्रवाह–तोयानें,
प्रभुहृदया द्रव सुटला वाटे दुःखाद्रि वाहतो यानें. १००

तारासुतें विनीतें वृत्तांत श्रीस साग्र ऐकविला,
गौरविला पावन तो पवनतनय वर्णवे न जो कविला. १०१
परिसुनि सकल कथा ती सुग्रीवासहित सर्व कपिदल तें,
उतरा निंब वदे, रिपुहृदयीं असें वीररत्न बहु सलतें. १०२
आलिंगिला रघुवरें कपिकुलमणि तो निजांकिं बैसविला,
गौरविला बहुतपरी जयदुंदुभि कपिगणेंहि वाजविला. १०३
चिंतामणीच तूं या जगतीतलिं सत्य लाभलास मज,
तूं अवतार शिवाचा, क्षुद्र कपि न, जाहला भला समज. १०४
सद्गुरु रघूत्तमाला शिष्य पवनतनय जो असामान्य,
तल्लीलानामक हें शतक रसिक आदरें करो मान्य. १०५

सप्तम शतक समाप्त.

———————— यशोधन.

## भिल्लाचें तुणतुण्यावर गाणें !

While gasp by gasp he falters forth his soul,
Ours with one pang-one bound escapes control!
Byron.

पद.

चालः– ऐन दुपारीं माझ्या गाई.

बघा आमुचें राज्य तसें हो बघा आमुचें घर
हें वन सारें, हें सर[1] सगळें; कोणा अमुची सर?

१ तोरणमाळ सरोवर.

सीमा कां या भिल्लमनाला ? जाइल सगळीकडे !
फिरेल वाऱ्यासवें; तयाला रोवितील कां कडे ?
कडे दास या पायांचे ! हे पाय वांकती कुणा ?
जो वदेल मजला, पाठीं त्याच्या आहे कां हो कणा ?

अमुची नंगी समशेर !
भेदिल काळीज चरचर !
ठेवुं तें मातापायांवर !

जो न आइला वांकवील हो, शरण येउनी, मान
सांगा त्याच्या कैसा राहिल मानेचा हो मान ?

२

तोरणमाळीं तोरण अमुच्या आइभवानीचें !
तिज देतों ताजे, प्रातःकाळीं, बळी बोकडांचे !
प्यारी मदिरा करिते डोळे खदिरांगाराचे !
ससे दुपारीं खातों, घेतों घुटके दारूचे !
मग तीरकामठा सखा लाडका खांद्यावरि घेतों !
सुंदर भाता बाणांचा हो, पाठीवर खुलतो !

कटिवर हो मग कड्यावर
बसते ! नारी ती तरवार !
वदते करा करा हो वार !

परि भाला काला काळविटाच्या रक्तामांसाचा
करितों आधीं !—नसे भिल्ल का रावांचा राजा ?

३

हें जंगल अमुचें; धंदा अमुचा दंगाधोप्यांचा !
श्रमच आमुची विश्रांती; ती शांति घात अमुचा !

येवो कांहीं संकट, येवो घाला रात्रीचा !
असे कुणाला परवा ! आत्मा हा स्वातंत्र्याचा ! !
नाचत होडी लागत गोडी तितुकी हो ज्याला,
जो मेघगर्जना करी बघोनी रानवराहाला,

तो क्रूर वाघ थरथर
कांपतो; पळतोही झरझर !
मग ती गुहा जयाचें घर !

स्वातंत्र्याची खरी कल्पना त्याला हो त्याला !
खरें वदा धनिकांनो, ती कां आहे तुह्मांला ?

४

धनिका वेड्या, कड्यांवरुनिया मारितोस कां उड्या ?
उड्या न घेतों दोन तोंच तो सांवर असुचा गड्या !
मउ शय्येचा गुलाम ! तुजला भीती मरणाची ! !
रोगांचें तव शरीर ! तळमळ होते जीवाची ! !
कुत्र्यावाणी लुडबुडसी तूं नारीच्या मागें !
प्रेम असो वा नसो, वदसि ‘ गे, ध्यान तुझें लागे ’ !

ती शिळा आमुची नार !
तिजला सवत असे तरवार !
तरिही मरण्याला मन तयार !

येवो मृत्यू उद्यां, आज वा आतां, याच क्षणीं
एक आकळी--एकच गुचकी--देहा सोडूं झणीं !

नाथ.

'भज सदा मनुजा कमळावरा'

श्लोक.

भुजगतल्पगतांबुजलोचना
घननिभा, विनतासुतवाहना
रुचिर पंकज--चक्र--गदा--धरा
भज सदा मनुजा ! कमलावरा. १

रुचिर कुंतल भृंगततीसम
विलसतें पट पीतमनोरम
जलधिजाश्रित--वाम--कलेवरा
भज सदा मनुजा ! कमलावरा. २

जप कशास, कशास तपाध्वर !
हुडकणें नच संगम सागर
सकल--शास्त्र--विलोकन कां करा ?
भज सदा मनुजा ! कमलावरा. ३

जगतिं दुर्लभ मानव देह हा
सुरवरादिहि वांछिति या पहा
विषयसंगति सोडि तरी जरा
भज सदा मनुजा ! कमलावरा ४

नच तुझीं वनितासुतबंधु हीं
नच पिता, जननी नच आप्तही
कुणि न वारिति बा ! यम--किंकरा
भज सदा मनुजा ! कमलावरा ५

क्षणिक बा ! अवघें जग हें असे
स्थिरपणा धन--यौवनिंही नसे

झडकरी सुविचार करीं बरा
भज सदा मनुजा ! कमलावरा ६

विविध--रोग--निकेतन, भंगुर
नवबिळीं युत जाण कलेवर
भरंवसा न धरीं, तनुचा जरा
भज सदा मनुजा ! कमलावरा. ७

निशिदिनीं मुनिनीं मनिं ध्यायिला
शिव--महेंद्र--विरिंचिनिं वंदिला
जनि--जरा--भयहारक मा--वरा
भज सदा मनुजा ! कमलावरा. ८

कमलजावर--सुंदर--अष्टक
कवि रची, प्रभु--सेवक--बालक
हरिपदा जरि इच्छिसि बा ! नरा !
भज सदा तरि तूं कमलावरा. ९

बुध.

---

## मुलांचें गाणें.

पद.

हांसू खेळूं नाचूं या
आनंदानें गाऊं या
चमकति तारा गगनांत
हंसती कुसुमें विपिनांत
मंद मंद वायू विचरे
मधुपरिमल सुखकर पसरे !

चंद्र डुले
गगन खुलें
चित्त भुलें
प्रेमें उन्मन होऊं या
प्रेमीं गुंगुनि जाऊं या ! १

कोमल किरणें चंद्राचीं
हास्यें मोहक तारांचीं
नील नभाची निर्मळता
कुसुदांची वधु सुंदरता
बहु यत्नांनीं
हीं जमवोनी
मुलांस निर्मुनि
मंडित केली देवानें
ही अवनी उत्साहानें ! २

गिरिसंगें गातो वारा
प्रदेश नादित करि सारा
खेळत हंसत झरें पळती
विहंग आकाशीं उडती
तरू डोलती
लता नाचती
पुष्पें हंसती
क्रीडा मोदें अशी करूं
एथें तेथें मोद भरूं ! ३

नक्षत्रें संतत फिरती
नभा स्वगतिनें भूषविती
गरगर झरझर फिरूं तसे
पाहूं स्थिर जग राहि कसें !
खालीं वरती
मागें पुढती
व्यर्थ भ्रमती
भेद सर्व हे नष्ट करूं
एकीं सगळें विश्व भरूं ४

रेंदाळकर.

---

## विनोदी संध्या.

### श्लोक.

विनोदी ही संध्या, निजसखि निशेसाठिं जपुनी.
प्रसूनें उद्यानीं फुलवि निशिगंधा उपवनीं
त्वरेनें प्रेषोनी अलिकुलगणातें स्वभवनीं
प्रशांता सृष्टीतें हळुहळु करी; दे न कळुनी. १

सवें केला तीनें प्रखर रवि--दीप प्रशमित
रतिस्नेही तेथें प्रकट तम झाला अवचित
तसा केला वात प्रवह नव मंद स्वगतिशीं--
निशेला सौख्यानें निजगुज कथाया स्वपतिशीं. २

तिनें विश्वीं सारीं भरुनि सुषमा निद्रित जनां--
बळें केलें, जेणें न कुणि अवलोकी प्रियजनां
नसे ठावें तीतें कविस जगतीं सर्व कळतें !
निसर्गाचे ज्ञाते कवनिं रचितील स्वगुजतें. ३

पडोनी स्वस्थानीं निबिड तम-युक्ता तरुतलीं.
सुखें घे विश्रांति प्रियजनसवें जी विलसली.
करी रम्या केली शशिसह निशी, तें बघुनियां.
कथाया मी आलों, त्वरित नव गोष्टी स्वसखयां ! ४

—— कृष्णानुज, सं. ग. कालेकर.

## गुप्त स्वर्ग.

श्लोक.

जा कोठेंहि जगांत नित्य दिसते सर्वत्र हास्यप्रभा
दुःखाचें वर अभ्र येत पण तें अल्पावकाशीं पळे
जाते धूम्रशिखेपरी क्षणभरें निर्विण्णतेची छटा
दुःखाची रजनी न जाय सरुनी तों रम्य येते उषा ! १
ऐका कांहिंहि, माधुरी कितितरी येईल कानीं पण.
प्रेमाचीं वचनें पहा तरि जगीं थोडी न कीं चाललीं !
नाहीं हो ! पण भागणार वरच्या कर्णेंद्रियें केवल
गुप्त स्वर्ग उगाच काय भलत्या हातांत येतो असा ? २
कांहींही निरखा, दिसे चतुरता तेथें विधीची किती
जों जों नीट पहाल, होतिल तशीं गूढें किती मोकळीं !
नाहीं दिव्य हिराच केवळ, तसा तो कोळसाही असे
ज्या धर्में सुरवल्लिपुष्प घडलें, त्यानेंच हा धोतरा ! ३
झालें वाळुनि कोळ, फूल पडलें तें खालतीं वायुनें
तेथें सुंदर रोपडीं चिमुकलीं वाढून आलीं पुढें
दुःखी तो रडतो फुलास्तव, हसे रोपे बघूनी सुखी
स्वर्गी वा नरकीं स्वतांच पडती जाऊन सारे जण ! ४

साधें फूलहि एक, पान हिरवें, प्रेमें जरी पाहिलें
होतो रम्य सुखप्रवाह ह्रदयीं बाहेरही वाहता
ओढ्याची झुळझूळ, त्यांतिल तृणें खालीं वरी नाचतां
जो पाहील विमुग्ध दिव्यनयनें न स्वर्ग कीं त्या मिळे ?

आहे स्वर्ग इथें–घरांत अमच्या, तो गुप्त झाला पण
हा निंद्य व्यवहार, खेळ सगळे त्याचेच हे चालती !
थोडा कोणि नसो समीप दुसरा, होतो कसा मानव !
येतां कोणि तिजा, क्षणांत बसते वेडी तिथें सभ्यता !

अन्यांला भिउनीच पूर्ण खुरटीं झालीं मनें आमचीं
खोटी भीति धरून हाय ! मुकलों सौख्यास सारे जण !
सर्वांना मनिं वर्तन प्रिय गमे, तें निंद्य कां जाहलें ?
त्याच्याशीं पण काय काम अपुलें ? जाओत मातींत तें !

आहे हा व्यवहार--सभ्यपण हें, लोकांतला रौरव
त्यापायीं तुडवून दृष्टि अपुली फेका जराशी पुढें
स्वर्ग ! स्वर्ग ! सुरद्रुरम्यकुसुमीं या भूतला झाकलें !
आहे हांसत तेथ कोण बसलें--तुह्मींच तें ओळखा !

रेंदाळकर.

---

## लक्ष्मीस.

वृत्त–वसंततिलक.

लक्ष्मी ! तुझ्यास्तव किती घडती अनर्थ
वर्णावया जगिं नसे कुणिही समर्थ
हे सोड सोड तव चंचल सर्व चाळे
कां निर्दये ! पसरिसी तव दुष्ट जाळें

पाशांत त्या पडुनि लोक किती करीती
पापें; परी मिळविती तरि काय अंतीं ?
हा ! हाय ! ! नाहिं सहवास तुझा तयांस
दुष्कीर्ति, रौरव परी ठरलेंच खास २

जैं फेकसी मृदुल नेत्रकटाक्षबाण
ते नाचती, उडति सोडुनि देहभान
लक्ष्मी ! तुझ्यास्तवच ना ? पुतण्यास मारी
जो गाजला समरिं वीर 'रघो भरारी' ३

स्वर्गांगनेहुनि तुझें बहु रम्य रूप
मानोनि हे भुलति लोक किती अमूप
हा रौप्यनाद किति लावित वेड त्यांना
हा मोह ये न, तव आवरितां पिशांना ४

बंधूस बंधु न पुसे तुजसाठिं हाय !
तैशी पति प्रियतमाहि त्यजून जाय !
मित्रास मित्र न पुसे; दुरुनीच चाले !
लक्ष्मी ! तुझ्याविण जगीं नच पान हाले ५

लक्ष्मी ! त्वदाश्रित क्षणैक अशा खराचा
हे मूढ लोक करिती स्तव गे ! स्ववाचा
हें मोहजाल कसलें ! फसले कितीक
डोळे परी नुघडिती; त्यजिला विवेक ६

धावोनिया मृगजलापरि पार्श्वभागीं
तूझ्या कितीक थकले, दमले अभागी
अंतीं अनन्यगतिकीं धरिलें यमास
तूं सावलीपरि करीं नच लागलीस ७

क्षीराब्धि हा तव पिता, तव बंधु चंद्र
श्रीविष्णु ज्या भजत निर्जरनाथ इंद्र
भर्ता असोनि तव चंचलता पहातां
कोडें सुटे न; मति गुंगचि होय आतां ८

वास्तव्य अस्थिर तुझेंहि बघून वाटे
मोडोनि पायिं कमलांतिल सर्व कांटे
एका स्थलीं पद तुझें न टिके ह्मणोनी
तूं चालतेस कमले! चवड्यावरूनी ९

भू स्वर्ग होइल; किती टळतील युद्धें;
आनंद मूर्त विचरेल जगीं; अशुद्धें!
लोकीं स्वरूप तव सर्व जरी कळेल
तूझें, तरी सकल पाप रमे! पळेल. १०

---

स. ल. वि.

## समस्यापूर्ति.

चालू वर्षाच्या आठव्या अंकांत रा. रा. तिवारी यानीं दोन समस्या दिल्या आहेत. त्याची पूर्ति खालील मंडळीनें पाठविली आहे.

### समस्या पहिली.

बाहूंनीं दृढ आवळूनि सखिला सप्रेम सौधस्थलीं
नेतांना गळती सुमें कचकलापांतून तीं भूतलीं
सोडूनीं पद-धारणा कवि--सुता पाहे रसज्ञाकडे

*  *  *  *

[1]"कीं, ही केविं सुवर्णपुष्परचना होईल आतां गडे! १
[2]"टाकोनी कुसुमें" वदे "न पुढती हें योग्य जाणें गडे" १

[3]देवा ! स्वामिनि--नायका ! हरि हरा राहे तंली* बापुडे १

समस्या दुसरी.

थोडा वेळ विचारमग्न बसलों ठेवूनि मी लेखणी
कांहीं आठवतांच, ती हरपली मत्काव्यसल्लेखनीं
होती सन्निध मत्प्रिया तिजकडे म्यां पाहिलें सस्मित

* * * *

[1]तों ती हांसत बोलली "मज गडे ! नाहीं बरें माहित!" २
[2]झाली विस्मित ती कपोलिं मग ये तीच्याहि मंद स्मित २
[3]पारीजातकसें? मशी मज दया ! दे वासुदेवांकित २
[4]तीतें देखुनि, मद्विचार ग्रथितां, मी जाहलों विस्मित २

ध्रुव.

( चालः– राम माझा प्राण० )

पद.

ध्रुव-कीर्ति-श्रवण, मनन, हरिल आपदा धृ०
उत्तान पाद बाळ ध्रुवा देव पावला
भक्तिबळें नित्यपदा पाहि पोंचला
कां न धरा श्रीहरिच्या मंगला पदा १
सान मुलांसह लीला, खेळ, खेळतां
बाळ ध्रुवा "तातहीन" ह्मणुनि बोलतां
अंतरिं तो बाळ तयें फार खोंचला २

---

१ दु. आ. तिवारी. २ विठ्ठल कृष्ण नेरूरकर. ३ स्वामीराज वासुदेव उपाध्ये. ४ श्रीदत्त.

* तल लोकांत.

सुनीति माय तीस पुसे, ' तात कोणता
माय दावि नृपतिकडे बोट तत्वता
नृप--तातदर्शनासि, बाळ जाउं लागला ३
" प्रिय भूपा सवत सुरुचि हें न साहिल "
" दुर्वह सापत्नपणा तुजशि होइल "
कथितां हे सुनीति--नयनिं पूर लोटला ४
सुहृदांसह धृव एका समयिं नृपगृहा
जातां नृप लोभुनि त्या अंकिं घे पहा
देखुनि हें सुरुचीनें त्यास लाथिला ५
रडुनि तईं बाळ धृवें शोक मांडिला
सुनीति वदे;-- पुण्यलाभ नाहिं त्याजला
केंवि महा पद होई प्राप्त त्याजला ६
" भक्तिबळें देव जयें नाहिं पूजिला
" संकटिं ही देव जयें नाहिं अठविला
" देव तया देइ कसा थोर पदाला ७
" सुकृत करुनि पुण्य जयें नाहिं जोडिलें
" त्यास जाण श्रीहरिनें पूर्ण टाकिलें
" देव तया नेइ कसा आत्मपदाला " ८

" देव असे सांग कसा मजशि समजुं दे
" देव वसे सांग कुठें मजशिं पाहुं दे
" भक्ति--बळें जननि तया करिन आपुला ९
हें पुसतां धृव बाळें माय बोलली
देवमूर्ति सकल विश्व भरुनि ठाकली

ठाव न त्याविण कोठें रिक्त राहिला १०
मुनि जन, ऋषि, योगि सदा प्रभुस धुंडिती
दर्शन दे प्रेमभरें देव त्यांप्रती
पुण्य-हृदयिं करुनि गुहा देव राहिला ११
मातृवचा परिसुनि ह्या जाय धृव वना
लोटति तैं अश्रु, जनक जननि-लोचना
तात तईं सकल राज्य अर्पु लागला १२
नश्वर हें राज्य नको, सर्व पावलों
भक्तिबळें देव पद-स्मरण लाभलों
तरि तयांत पुण्यलाभ पूर्ण संचला १३
वदुनि असें देव पिरें भरुनि अंतरीं
रुद्ध--कंठ सजल नयन स्मरत श्रीहरी
वदत मुखें " धांव प्रभो, प्रणत वत्सला " १४
यापरि धृव करुणरवा परिसुनी हरी
घननीळ प्रकट होइ तेथ सत्वरीं
दिव्य रूप देखुनि धृव वंदि पावला १५
देव वदे, " माग राज्य स्वर्ग पृथ्विचें
माग विभव, भोगिं भोग, भोग--लोकिंचे
नयन झरत वदत हरिस, चरणिं विनटला १६
" देशि जरी दे देवा ! दयित होउनी
" देइं तरी भक्ति तुझी रति तवार्चनीं
" वदन वदो नाम तुझें सतत मंगला १७
" ' तव पदारविंद--भृंग, ' वत्सलांछना !
" शाश्वत पद हेंचि मिळो, हीच प्रार्थना

" काय मागुं अधिक प्रभो ! भक्त–वत्सला १८

चंद्र, सूर्य, नक्षत्रें, अखिल तारका
ग्रह तैसे, सप्तऋषी, फिरति बालका
तुज भोंवति, घेइ अचा नित्य पदाला १९
वदुनि असें प्रेमभरें स्थापिलें ध्रुवा
दिव्य पदीं, प्राप्त न जें देवदानवा
तद्दर्शन तव पद हरि, देउं मंगला ! २०

किरात.

---

## मूर्खाचें समाराधन.

श्लोक.

गिळंकृतहि रत्न तें मकरवक्त्र–दंष्ट्रेतुनी
बळें करुनि काढुं ये कसहि आननीं घालुनी;
परी नच दुराग्रही जन--मनास ये आवरूं
न मूर्खजनचित्त तें कधिं प्रसन्न येई करूं १
समुद्र खवळूनिया उसळतांहि लाटा महा
सुबाहु--बळ योजुनी सहज लंघितां ये पहा;
परी नच दुराग्रही जन--मनास ये आवरूं
न मूर्खजनचित्त तें कधिं प्रसन्न येई करूं २
भुजंग अति उग्र ज्या विषहि कालकूटापरी
जरी कुपित ये धरूं शिरिं सुपुष्प--माळेपरी
परी नच दुराग्रही जन--मनास ये आवरूं
न मूर्खजनचित्त तें कधिं प्रसन्न येई करूं. ३

किरात.

---